सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प ४३ वें

# प्र वा सी

**महाकवि खलिल जिब्रान**
याच्या The Wanderer नामक ग्रंथाचा अनुवाद



अनुवादक
**रघुनाथ गणेश जोशी**




मे १९४८ ] [ मूल्य २ रु.

# प्रवास-मार्गावर

सहा वर्षांपूर्वी जिब्रानचें " जीवन-दर्शन " ( Prophet ) महाराष्ट्रीय वाचकवर्गाला मीं सादर केलें. त्याचें रसिकांनीं उत्साहानें स्वागत केल्यामुळें आतांपर्यंतच्या अवधींत त्या पुस्तकाच्या तीन आवृत्त्या काढाव्या लागल्या. या प्रोत्साहनामुळें जिब्रानच्या आणखीहि कांहीं कलाकृती मराठींत आणण्याचें मीं ठरविलें होतें. त्यास अनुसरूनच प्रस्तुत पुस्तकाचें प्रकाशन होत आहे.

Wanderer हें पुस्तक जिब्रानच्या मृत्यूनंतर इ. स. १९३२ सालीं अमेरिकेंत प्रथम प्रकाशित झालें; आणि आतांपर्यंतच्या अवधींत त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. या पुस्तकांत जीवन-सत्याच्या शोधार्थ अखिल विश्वांत परिभ्रमण करणाऱ्या प्रवाशानें—परिव्राजकानें—सांगितलेल्या एकावन्न कथा ग्रथित करण्यांत आल्या आहेत. जिब्रानच्या अंतर्भेदी प्रतिभेंतूनच हा प्रवासी जन्मला असल्यामुळें त्यानें सांगितलेल्या या कथांत जिब्रानचीं सारीं गुणवैशिष्ट्यें साकल्यानें प्रकट झालेलीं दिसून येतील. आपल्या चर्मचक्षूंना न दिसणारे अनेक चमत्कार दाखवून हा प्रवासी आपणांला क्षणांत विस्मित करील, तर दुसऱ्या क्षणीं मानवी स्वभावांतील दोषास्पद विसंगतीची मजा दाखवून हंसत राहील ! बदलत्या काळाबरोबर बदलत जाणाऱ्या मनाचीं स्थित्यंतरें तो कधीं हळुवारपणें चितारील, तर कधीं परंपरागत रूढ धर्मभावनेवर निर्दयतेनें प्रहार करील ! कधीं टीकाकाराच्या भूमिकेवरून हळूच शिक्षणशास्त्राचा आधुनिक सिद्धान्त शिकवील, तर कधीं राजकारणांत शिरून अरेराव राजांना खऱ्या राजधर्माची दीक्षा देईल ! अशा रीतीनें जीवनांतील कटु अनुभवांना मधुर परिवेष देऊन हा प्रवासी आपणांस त्यांचें दर्शन घडवीत आहे.

जिब्रान हा " साध्याहि विषयांत मोठा आशय " पाहणारा महान् कलाकार आहे. प्रज्ञा आणि प्रतिभा यांचा मनोज्ञ संगम त्याच्यांत

झाला असल्यामुळें त्यानें वर्णिलेल्या लौकिक दृश्यालाहि अलौकिक सौंदर्य प्राप्त होतें. वरवर यःकश्चित् दिसणाऱ्या एकाद्या घटनेची तो आपल्या कथा-वस्तूसाठीं निवड करील; त्या वस्तूचें मंथन करून आपल्या प्रज्ञाशक्तीनें तिच्या अंतरंगाचा ठाव घेईल; एकाद्या किमयागाराप्रमाणें आपल्या प्रतिभेच्या संजीवनीनें तिच्यांत प्राणवायु फुंकील; आणि क्षणार्धात शब्दावगुंठित अशी सौंदर्यमूर्ति तुमच्यासमोर उभी राहील!

या अनुवादाविषयीं थोडासा खुलासा करणें अवश्य आहे. अनुवादाच्या अनेक पद्धती प्रचलित असल्या, तरी माझ्यापुरती एक पद्धत मीं निश्चित केली आहे. मुळांतील भाषा, अर्थ, भाव आणि रस यांना यत्किंचितहि धक्का न लावितां त्या सर्वांचें सौंदर्य जसेंच्या तसेंच राखण्याचा मीं कांटेकोरपणें प्रयत्न केला आहे. हा केवळ भावानुवाद नव्हे; आणि स्वैर अनुवाद तर नव्हेच नव्हे. या अनुवादाच्या वाचकांना जिब्रानच्या सर्व पैलूंच्या सौंदर्याचें यथातथ्य दर्शन व्हावें म्हणून मूळ कृतीचें हुबेहुब प्रतिबिंब उमटविण्याची माझी मनीषा आहे.

या पुस्तकाच्या नामाभिधानाबद्दल थोडासा मतभेद होण्याचा संभव आहे. 'Wanderer' म्हणजे 'भटक्या.' पण हा शब्द मराठींत तितक्याशा चांगल्या अर्थानें वापरला जात नाहीं. 'पान्थ', 'चिर-प्रवासी' असेहि शब्द सुचले; पण सर्व दृष्टींनीं विचार करून अखेर 'प्रवासी' हेंच सुटसुटीत नांव निश्चित केलें. वाचकांनाहि तें अन्वर्थक वाटेल अशी आशा आहे. पुस्तकांतील कांहीं कथांचीं शीर्षकें तितकीशीं अनुरूप न वाटल्यामुळें तीं बदलून त्यांत अधिक अर्थवाहकता आणिली आहे.

शेवटीं "(प्रवास-) मार्गावरील धूलि आणि तितिक्षा यांनींच या कथांची गुंफण झाली" असल्यामुळें माझ्याप्रमाणेंच वाचकांनाहि या कथा बहुमोल वाटतील, असा मला विश्वास आहे.

पुणें, १५-५-४८ — र. ग. जोशी

# अनुक्रम

# प्रवासी

बाजूच्या रस्त्यावर मी त्याला भेटलों. परिधान केलेली एक पायघोळ कफनी आणि एक काठी एवढेंच केवळ त्याच्याजवळ होतें आणि त्याच्या मुखावर दुःखाची छटा दृग्गोचर होत होती. आम्हीं परस्परांना अभिवादन केलें आणि मी त्याला म्हणालों, " माझ्या घरीं चल आणि माझ्या आतिथ्याचा स्वीकार कर."

आणि तो घरीं आला.

घराच्या उंबरठ्यांतच माझी पत्नी आणि माझीं मुलें आम्हांला भेटलीं. त्यांच्याकडे पाहून तो हंसला आणि त्याचें आगमन त्यांना प्रिय वाटलें.

नंतर आम्ही सर्व जण मिळून भोजनास बसलों आणि आम्हांला त्याचा सहवास सुखकर वाटला. कारण त्याच्यामध्यें निःस्तब्धता आणि गूढता भरून राहिली होती.

आणि रात्रीच्या जेवणानंतर आम्ही शेकोटी-

भोंवतीं जमलों आणि त्याच्या प्रवासाविषयीं त्याला विचारलें.

त्या रात्रीं आणि दुसऱ्या दिवशींहि त्यानें आम्हांला पुष्कळ गोष्टी सांगितल्या. पण त्या गोष्टींविषयीं मी आतां असें नमूद करून ठेवितों, कीं तो स्वतः दयार्द्र असतांहि त्याच्या जीवनांत त्यास जी कटुता अनुभवावी लागली, त्या कटुते-मधूनच त्या कथांचा जन्म झाला होता; आणि त्याच्या मार्गावरील धूलि आणि तितिक्षा ह्यांनींच या कथांची गुंफण झालेली आहे.

आणि तीन दिवसांनंतर जेव्हां तो आमच्यांतून निघून गेला, तेव्हां एकादा पाहुणा परत गेला असें आम्हांस भासलें नाहीं. तर आमच्यापैकींच एक जण अजून बाहेर बगीच्यांत आहे आणि अजून तो आंत आला नाहीं, असेंच आम्हांला भासलें.

## बदललेलीं वस्त्रें

एके दिवशीं समुद्राच्या किनाऱ्यावर सुंदरता आणि कुरूपता यांची गांठ पडली आणि त्या एकमेकींना म्हणाल्या, "आपण समुद्रांत स्नान करूं या."

नंतर आपापलीं वस्त्रें काढून ठेवून त्यांनीं जलविहार केला आणि थोड्या वेळानें कुरूपता किनाऱ्यावर परत आली, आणि सुंदरतेचीं वस्त्रें परिधान करून आपल्या मार्गानें निघून गेली.

आणि सुंदरताहि समुद्रांतून बाहेर आली आणि पाहते तों आपलीं वस्त्रें बेपत्ता! आणि नग्न राहण्याची तिला फार लाज वाटूं लागली; म्हणून कुरूपतेचींच वस्त्रें धारण करून सुंदरता आपल्या मार्गानें निघून गेली.

आणि अगदीं आजहि पुरुष आणि स्त्रिया त्या एकमेकींना ओळखण्यांत चूक करीत आहेत.

तथापि, कांहीं जण असे आहेत, कीं ज्यांनीं सुंदरतेचें मुख पाहिलें आहे आणि तिच्या परि-

वेषाकडे लक्ष न देतां ते तिला बरोबर ओळखतात. आणि कुरूपतेचा चेहेरा ओळखणारेहि कांहीं आहेत आणि त्यांच्या नजरेंतून तीं वस्त्रें कुरूपतेला लपवूं शकत नाहींत.

## गरुड आणि चंडोल

एका उंच पहाडावरच्या खडकावर चंडोल आणि गरुड यांची भेट झाली. चंडोल म्हणाला, "नमस्कार, महाराज." आणि त्याच्याकडे तुच्छतेनें बघत गरुड अस्पष्टपणेंच उद्गारला, "नमस्कार."

आणि चंडोल म्हणाला, "आपलें सर्व ठीक चाललें असेल अशी मला आशा आहे, महाराज."

"होय," गरुड म्हणाला, "आमचें सर्व ठीक चाललें आहे. पण, आम्ही पक्ष्यांचे राजे आहोंत आणि आम्हीं स्वतः बोलण्यापूर्वी तूं आम्हांला संबोधून बोलूं नयेस हें तुला समजत नाहीं काय?"

चंडोल म्हणाला, "मला वाटतें, आपण एकाच कुटुंबांतील आहोंत."

गरुडानें त्याच्याकडे तिरस्कारानें पाहिलें आणि तो म्हणाला, "तूं आणि मी एकाच कुटुंबांतील आहोंत हें तुला कोणीं अन् कधीं सांगितलें?"

नंतर चंडोल म्हणाला, " पण मला आपणांस स्मरण करून द्यावेंसें वाटतें, कीं मीहि आपणां-इतकेंच उंच उड्डाण करूं शकतों; मी गाऊं शकतों, आणि ह्या पृथ्वीवरच्या इतर प्राण्यांना आनंद देऊं शकतों. आणि आपण तर सुखहि देत नाहीं आणि आनंदहि देत नाहीं."

या उत्तरानें गरुडाला राग आला आणि तो खेंकसून म्हणाला, " सुख आणि आनंद ! अरे मगरूर कीटका ! माझ्या चोंचीच्या एका फटकाऱ्यानें मी तुझा निकाल लावूं शकेन. माझ्या पायाएवढा तर तुझा सारा देह ! "

तेवढ्यांतच उड्डाण करून चंडोल गरुडाच्या पाठीवर उतरला आणि त्याचीं पिसें उपटूं लागला. गरुड अगदीं त्रस्त होऊन गेला आणि त्या लहानग्या पक्ष्यापासून मुक्त होण्याकरितां त्यानें उंच वेगाची भरारी मारिली. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस अत्यंत क्षुब्ध होत्साता, त्या लहानग्या पक्ष्याचें ओझें पाठीवर तसेंच वागवीत आणि प्राप्त प्रारब्धाला बोल लावीत

त्या उंच पहाडाच्या त्याच खडकावर तो परत उतरला.

तेवढ्यांतच एक लहानसें कांसव तेथें आलें आणि समोरचें दृश्य पाहून हंसूं लागलें. त्याला एवढें हंसूं कोसळलें, कीं हंसतां हंसतां तें गडबडा लोळूं लागलें.

गरुडानें त्या कांसवाकडे तिरस्कारानें पाहिलें आणि म्हटलें, "जमिनीशीं नित्य जखडून असणाऱ्या, सरपटणाऱ्या मंद प्राण्या, तूं कां हंसतो आहेस?"

आणि तें कांसव उत्तरलें, "कां म्हणून काय विचारतोस? तुझें तर घोड्यांत रूपांतर झालेलें मला दिसत आहे आणि एक लहानगा प्रक्षी तुझ्यावर स्वार झालेला आहे! पण तो लहानगा पक्षी मात्र अधिक चांगला आहे."

आणि गरुड त्याला म्हणाला, "आपल्या कामाला चालूं लाग कसा! चंडोल— माझा भाऊ— आणि मी यांच्यामधील ही घरगुती बाब आहे."

## प्रेमगीत

एका कवीनें एकदां एक सुंदर प्रेमगीत लिहिलें, आणि त्याच्या अनेक प्रती तयार करून त्या आपले मित्र आणि परिचित यांच्याकडे त्यानें पाठवून दिल्या. त्या मित्र-परिचितांमध्यें पुरुष आणि स्त्रिया होत्या आणि त्या पर्वतराजीपलीकडे राहत असलेली आणि जिला केवळ एकदांच तो भेटला होता अशी एक युवतीहि होती.

आणि एक-दोन दिवसांतच त्या युवतीकडून पत्र घेऊन एक जासूद आला. त्या पत्रांत तिनें म्हटलें होतें, " तुम्हीं मला जें प्रेमगीत लिहिलें आहे त्यानें खरोखर, मी अगदीं विव्हल होऊन गेलें आहे. तर आतां इकडे येऊन माझ्या आई-बापांची भेट घ्या म्हणजे आपण वाङ्निश्चयाची तयारी करूं."

आणि त्या पत्राला दिलेल्या उत्तरांत कवीनें तिला लिहिलें, " हे स्नेहलते, तें गीत म्हणजे केवळ कवि-हृदयांतून प्रकट झालेलें प्रेमाचें एक

गीत होतें. प्रत्येक पुरुषानें प्रत्येक स्त्रीला तसेंच गीत गाइलेलें असतें."

आणि तिनें त्याला पुनः लिहिलें, "ढोंगी आणि खोटें बोलणाऱ्या माणसा! तुझ्या या कृत्या-मुळें आजपासून मरेपर्यंत सर्व कवींचा मी तिरस्कार करीत राहीन."

## हास्य आणि अश्रू

नाइल नदीच्या तीरावर सायंकाळीं एका तरसाला मगर भेटली. तेव्हां तीं दोघें थांबलीं आणि त्यांनीं परस्परांना अभिवादन केलें.

तरसानें विचारलें, "काय बाईसाहेब, आपलें कसें काय चाललें आहे?"

आणि उत्तर देतांना मगर म्हणाली, "सध्यां फार वाईट दिवस आले आहेत. माझ्या वेदनेमुळें आणि दुःखामुळें मी कधीं कधीं अश्रू ढाळतें; आणि माणसें नेहमींच म्हणतात, ते केवळ नक्राश्रू आहेत. आणि त्यामुळें मला एवढें दुःख होतें, कीं तें सांगतां येत नाहीं."

तेव्हां तरस म्हणाला, "तुझ्या वेदना आणि तुझें दुःख यांविषयीं तूं बोलतेस; पण एक क्षणभर माझ्याविषयींहि विचार कर. जगांतील सौंदर्य, त्यांतील चमत्कार आणि आश्चर्यें यांकडे मी अनिमेष दृष्टीनें बघत राहतों आणि शुद्ध आनंदा-

मुळें दिवसाच्या हास्याबरोबर मीहि हंसतों. आणि नंतर अरण्यांतील लोक म्हणतात, ‘ तें तर केवळ तरसाचें हास्य आहे.’ ”

## असभ्य तरुण

शेजारच्या खेड्यांतून एक अत्यंत सुरेख मुलगी जत्रेला आली. तिच्या मुखावर निशिगंध आणि गुलाब फुलले होते. सूर्यास्तींचे किरण तिच्या केशकलापांत होते आणि ओष्ठांवर उषेचें हास्य विलसत होतें.

ती नवसौंदर्यशालिनी दृष्टीस पडते न पडते तोंच तरुण मंडळी तिच्याकडे पाहूं लागली आणि तिच्याभोंवतीं गोळा झाली. कोणीं तिच्याबरोबर नाचण्याची इच्छा प्रदर्शित केली, तर कोणीं तिला भोजनाचें आमंत्रण दिलें आणि त्या सर्वांनीं तिच्या कपोलाचें चुंबन घेण्याची इच्छा दर्शविली. कारण बोलूनचालून ती जत्राच नव्हती का ?

पण त्या मुलीला धक्का बसला आणि ती बुजली आणि त्या तरुण मंडळीविषयीं तिच्या मनांत प्रतिकूल ग्रह निर्माण झाला. तिनें त्यांना दटावलें आणि त्यांच्यापैकीं एक-दोघांच्या तर श्रीमुखांतहि तिनें ठेवून दिल्या आणि नंतर त्यांच्यामधून ती पळून गेली.

आणि त्या दिवशीं सायंकाळीं घरीं परततांना आपल्या मनांत ती म्हणत होती, " अगदीं वीट आलाय् मला! किती असभ्य आणि वाह्यात् आहेत हे लोक! अगदीं असह्य आहे हें!"

एक वर्ष लोटलें आणि तें सबंध वर्ष तिनें जत्रा आणि तरुण यांचें बरेंचसें चिंतन करण्यांतच घालविलें. आणि आपल्या मुखावर निशिगंध आणि गुलाब फुलवीत, केशकलापांत सूर्यास्तींचे किरण गुंफीत आणि आपल्या ओष्ठांवर उषेचें हास्य नाचवीत ती पुन्हां जत्रेला आली.

पण आतां तिला पाहून तरुण मंडळी दुसरीकडे वळली. आणि सबंध दिवसभर तिच्याकडे कोणी ढुंकलें नाहीं आणि ती एकाकीच राहिली.

आणि त्या दिवशीं सायंकाळीं घराकडे परत जातांना आपल्या हृदयांत ती आक्रंदत होती, " अगदीं वीट आलाय् मला! किती असभ्य आणि वाह्यात् आहेत हे तरुण! अगदीं असह्य आहे हें!"

## दोन राण्या

शावाकिस शहरांत एक राजा राहत होता. पुरुष, स्त्री आणि मुलें हीं सर्व जण त्याच्यावर प्रेम करीत असत. इतकेंच नव्हे, तर शेतांतले प्राणीहि त्याला अभिवादन करण्याकरितां येत.

पण सर्व लोक म्हणत, कीं त्याच्या राणीचें त्याच्यावर प्रेम नव्हतें; नव्हे, ती त्याचा तिरस्कार करीत असे.

एके दिवशीं शेजारच्या शहरांतील एक राणी शावाकिसच्या राणीच्या भेटीस आली. त्यांनीं बऱ्याच गप्पागोष्टी केल्या आणि बोलण्याच्या ओघांत त्यांच्या नवऱ्यांचा विषय निघाला.

आणि शावाकिसची राणी क्षुब्ध होऊन म्हणाली, "मला तुझा हेवा वाटतो. तुमच्या विवाहाला इतकीं वर्षे लोटलीं तरी तुम्ही उभयतां सुखांत आहांत. मी मात्र अत्यंत अभागी आहें. मला माझ्या नवऱ्याचा तिरस्कार वाटतो. तो केवळ माझ्या एकट्याचाच नाहीं."

तेव्हां भेटीला आलेल्या राणीनें तिच्याकडे निरखून पाहिलें आणि म्हटलें, "सखे, खरी गोष्ट अशी आहे, कीं तुझें तुझ्या नवऱ्यावर प्रेम आहे. होय, त्याच्याविषयींचा तुझा अनुराग अजूनहि बहरलेला आहे; आणि उद्यानांत जसा वसंत, तसाच रमणीच्या जीवनांत हा अनुराग. पण माझी आणि माझ्या नवऱ्याची स्थिति अनुकंपनीय आहे; कारण आम्ही एकमेक निमूटपणें कसेंतरी निभावून घेत आहोंत. आणि तूं आणि इतर लोक यालाच सुख म्हणून मानतां."

## मुक्तीचा मार्ग

बाहेर वादळ चाललें होतें आणि ख्रिस्ती धर्माध्यक्ष आपल्या धर्मपीठमंदिरांत होता. आणि ख्रिस्ती नसलेली एक स्त्री येऊन त्याच्यासमोर उभी राहिली आणि म्हणाली, "मी ख्रिस्तधर्मी नाहीं. नरक-यातनांतून मला मुक्ति आहे काय?"

धर्माध्यक्षानें तिच्याकडे पाहिलें आणि तिला उत्तर दिलें, "नाहीं, जलसंस्कारानें ज्यांना बाप्तिस्मा दिला गेला आहे त्यांनाच केवळ मुक्ति आहे."

आणि तो एवढें बोलतो न बोलतो, तोंच आकाशांतून विजेचा एक लोळ कडाडून त्या मंदिरा-वर पडला, आणि तें मंदिर आगीनें भरून गेलें.

आणि नगरांतले लोक धांवत आले आणि त्या स्त्रीला त्यांनीं वांचविलें; पण तो धर्माध्यक्ष मात्र अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडला!

## तपस्वी आणि पशुपक्षी

एके काळीं हिरव्यागार गिरिकंदरांत एक तपस्वी वास करीत असे. तो शुद्ध मनाचा आणि निर्मळ हृदयाचा होता. जमिनीवरचे सर्व प्राणी आणि हवेंतील सर्व पक्षी जोडप्यानें त्याच्याकडे येत असत आणि तो त्यांच्याशीं बोलत बसे. त्याचें बोलणें ते आनंदानें ऐकून घेत. ते त्याच्याजवळ गोळा होत आणि रात्र होईपर्यंत तेथून हालत नसत. आणि नंतर आपले आशीर्वाद देऊन वायूच्या आणि वनाच्या हवालीं करीत तो त्यांना परत पाठवून देत असे.

एकदां सायंकाळीं तो प्रेमाविषयीं बोलत असतां आपली मान वर करून एका चित्त्यानें त्या तपस्व्याला विचारलें, "तुम्ही आम्हांला प्रेमाविषयीं सांगतां. तर महाराज, तुमची सहचारिणी कोठें आहे तें आम्हांला सांगा."

आणि तपस्वी म्हणाला, "मला सहचारिणी नाहीं."

तेव्हां पशुपक्ष्यांच्या त्या मेळाव्यांतून एकच आश्चर्योद्गार निघाला आणि ते आपापसांत म्हणूं लागले, " प्रेमाविषयीं आणि लग्नाविषयीं स्वतःला कांहींच माहीत नसतांना त्यांविषयीं आपणांस हा कसें सांगूं शकतो ? " आणि त्याला तसाच सोडून चकार शब्द न काढतां तिरस्कारानें ते निघून गेले.

त्या रात्रीं तो तपस्वी आपल्या चटईवर अधोमुख होऊन पडला, आणि आपली छाती बडवून घेऊन ढसढसा रडला.

## द्रष्टा आणि बालक

शारिया नामक द्रष्ट्याला एके दिवशीं बगीचांत एक बालक भेटलें. तें त्याच्याकडे धांवत आलें आणि म्हणालें, " नमस्कार, महाराज." आणि प्रतिनमस्कार करून तो द्रष्टा म्हणाला, "मला वाटतें, तूं एकटाच आहेस."

तेव्हां तें बालक मोठ्यानें हंसून आणि आनंदित होऊन म्हणालें, " बऱ्याच वेळापूर्वी माझ्या दाईची चुकामूक झाली आहे. तिला वाटतें, कीं मी त्या कुंपणामागें आहें. पण तुम्ही बघतां ना, कीं मी इथेंच आहें?" नंतर त्या द्रष्ट्याच्या मुखाकडे निरखून पाहून तो पुनः बोलला, " तुम्हीसुद्धां एकटेच दिसतां. तुमची दाई कोठें आहे?"

द्रष्ट्यानें उत्तर दिलें, " हां, आतांची गोष्ट जरा निराळी आहे. पण खरें म्हटलें तर नेहमींच कांहीं तिची-माझी चुकामूक पडत नाहीं. पण आतां जेव्हां मी या बगीचांत आलों, तेव्हां त्या कुंपणामागें ती मला शोधीत होती."

टाळ्या वाजवीत तें बालक ओरडलें, " म्हणजे तुम्हीहि माझ्यासारखेच हरवलेले आहांत ! असें हरवणें बरें असतें, नाहीं ?" आणि नंतर तें म्हणालें, " तुम्ही कोण आहांत ? "

आणि त्या द्रष्ट्यानें उत्तर दिलें, " लोक मला ज्ञानी शारिया म्हणतात. आणि मला सांग, तूं कोण आहेस ?"

" मी म्हणजे मीच आहें," तें बालक म्हणालें, " आणि माझी दाई माझा शोध करीत आहे, आणि मी कोठें आहें हें तिला माहीत नाहीं."

आकाशाकडे दृष्टि लावीत तो द्रष्टा उद्गारला, " मीहि माझ्या दाईला चुकवून जरासा आलों आहें, पण ती मला शोधून काढील."

आणि तें बालक म्हणालें, " मलाहि माझी दाई शोधून काढील हें नक्की."

तेवढ्यांतच त्या बालकाच्या नांवानें हांका मारीत असलेल्या एका बाईचा आवाज ऐकूं आला. " बघा," तें बालक म्हणालें, " मीं तुम्हांला सांगितलें होतें, कीं ती मला शोधीत असेल."

आणि त्याच क्षणीं दुसरा एक आवाज ऐकूं आला, " कोठें आहेस तूं, शारिया ? "

आणि तो द्रष्टा म्हणाला, " बघ, माझ्या मुला, त्यांनीं मलाहि शोधून काढिलें."

आणि आपलें मुख वरतीं करून शारियानें उत्तर दिलें, " हा मी येथें आहें."

## मौक्तिक

समुद्रांतील एक कालव शेजारच्या कालवाला म्हणालें, " माझ्या अंतरंगांत एक फार मोठें दुःख आहे. तें जड आणि वाटोळें आहे आणि त्यामुळें मी अगदीं हैराण होऊन गेलों आहें."

आणि अभिमानयुक्त समाधानांत दुसरें कालव उत्तरलें, " आकाश आणि समुद्र यांना धन्यवाद असोत; माझ्या अंतरंगांत कसलेंच दुःख नाहीं. मी अगदीं आंतरबाह्य पूर्ण निरोगी आहें."

त्याच क्षणीं एक खेंकडा जवळून जात होता आणि त्यानें त्या दोन कालवांचा संवाद ऐकला आणि आंतरबाह्य पूर्ण निरोगी असणाऱ्याला तो म्हणाला, " होय, तूं पूर्ण निरोगी आहेस खरा; पण तुझा शेजारी सोशीत असलेलें दुःख म्हणजे दुसरेंतिसरें कांहीं नसून एक अत्यंत सुंदर असें मौक्तिक आहे."

## शरीर आणि आत्मा

एक पुरुष आणि स्त्री वसंत ऋतूंत एका उघड्या गवाक्षाजवळ बसलीं होतीं. तीं एकमेकांना चिकटून बसलीं होतीं. आणि ती स्त्री म्हणाली, "मी तुझ्यावर प्रेम करतें. तूं सुंदर आहेस, श्रीमंत आहेस आणि तूं नेहमींच छानदार कपड्यांनीं नटलेला असतोस."

आणि तो पुरुष म्हणाला, "माझें तुझ्यावर प्रेम आहे. तूं म्हणजे एक सुंदर विचार आहेस, हातांत पकडून ठेवण्याला अत्यंत पृथक् अशी वस्तु आहेस, आणि माझ्या स्वप्नांतील गीत आहेस."

पण ती स्त्री रागानें त्याच्यापासून निघाली, आणि म्हणाली, "महाराज, कृपा करून मला आतां सोडा. मी म्हणजे विचार नाहीं, आणि तुमच्या स्वप्नांत वावरणारी एकादी वस्तूहि नाहीं. मी स्त्री आहें. तुमची पत्नी आणि भावी बालकांची माता म्हणून तुम्हीं माझी अपेक्षा करावी, अशी माझी इच्छा होती."

आणि तीं एकमेकांना सोडून गेलीं.

आणि तो पुरुष आपल्या हृदयांत म्हणत होता, " पहा, दुसऱ्या स्वप्नाचेंहि आतां धुक्यांत रूपांतर झालें आहे."

आणि ती स्त्री म्हणत होती, " ठीक आहे, माझें धुक्यांत आणि स्वप्नांत रूपांतर करणाऱ्या पुरुषाचें मला काय ? "

## राजा

सादिकच्या राज्यांतील लोकांनीं आपल्या राजाच्या राजवाड्याला वेढा दिला आणि त्याच्याविरुद्ध मोठमोठ्या आरोळ्या मारून त्यांनीं बंड पुकारलें. आणि एका हातांत आपला मुकुट आणि दुसऱ्या हातांत आपला राजदंड घेऊन राजवाड्याच्या पायऱ्या उतरून राजा खालीं आला. त्याची ती तेजस्वी मुद्रा पाहून तो जमाव स्तब्ध झाला. आणि त्यांच्यासमोर उभा राहून राजा म्हणाला, " माझ्या मित्रांनो, या क्षणापासून तुम्ही आतां माझे प्रजाजन राहिलां नाहींत. म्हणून माझा हा मुकुट आणि राजदंड मी तुमच्या हवालीं करतों. तुमच्यापैकींच एक जण होऊन राहण्याची माझी इच्छा आहे. मी तर काय एकटा सडाफटिंग; पण आपणां सर्वांचीच स्थिति सुधारावी म्हणून मनुष्य या नात्यानें मी तुम्हां सर्वांबरोबर राबावें असें मला वाटतें. राजाची आवश्यकताच नाहीं. म्हणून चला तर, आपण शेतांत आणि मळ्यांत जाऊं. हातांत हात

घालून कष्ट करूं. मीं कोणत्या शेतांत अथवा मळ्यांत जावें एवढें मात्र तुम्ही मला सांगा. आतां तुम्ही सर्व जणच राजे आहांत."

आणि लोक आश्चर्यचकित होऊन निःस्तब्ध बनले. कारण ज्या राजाला ते आपल्या असंतोषाचें मूळ मानीत होते, त्या राजानेंच आपला मुकुट आणि राजदंड आतां त्याच्या हवालीं केला होता आणि त्यांच्यापैकींच एक जण तो बनला होता.

त्यानंतर त्यांच्यापैकीं प्रत्येक जण आपापल्या मार्गानें निघून गेला आणि राजा एका माणसा-बरोबर शेतांत गेला.

पण राजा नसल्यामुळें सादिकच्या राज्याची स्थिति कांहीं सुधारली नाहीं; आणि देशभर पसरलेलें असंतोषाचें धुकें कायमच राहिलें. बाजारा-बाजारांतून लोक ओरडूं लागले, कीं आमच्यावर राज्य हवें आहे; आमच्यावर राज्य करणारा राजा आम्हांला हवा आहे. आणि वृद्ध व तरुण यांनीं जणुं एकाच आवाजांत घोषणा केली, " आम्हांला आमचा राजा पाहिजेच."

आणि त्यांनीं राजाला शोधून काढिलें. शेता-मध्यें खपत असलेला तो त्यांना आढळला. त्यांनीं त्याला सिंहासनावर आणून बसविलें आणि त्याचा मुकुट आणि त्याचा राजदंड त्यास परत दिला. नंतर ते म्हणाले, “ आतां बलानें आणि न्यायानें आमच्यावर राज्य करा.”

आणि तो म्हणाला, “ मी तुमच्यावर सर्व बल खर्च करून तर राज्य करीनच; पण न्यायानेंहि राज्य करतां यावें म्हणून स्वर्ग-पृथ्वी-वरील देवता मला साहाय्य करोत.”

तदनंतर कांहीं स्त्री-पुरुष आले आणि आप-णांला अयोग्य रीतीनें वागविणाऱ्या आणि केवळ गुलाम करून सोडणाऱ्या एका जमीनदाराविरुद्ध त्यांनीं आपलें गाऱ्हाणें त्याच्यासमोर मांडिलें. आणि लागलीच त्या जमीनदाराला राजानें आपल्यापुढें आणिलें आणि तो म्हणाला, “ परमेश्वराच्या ताजव्यांत एका मनुष्याचें जीवन दुसऱ्याच्या जीवनाइतकेंच तोलाचें आहे. आणि तुझ्या शेतांत आणि मळ्यांत राबणारांचीं जीवनें

कशीं तोलावींत हें तुला ज्या अर्थीं कळत नाहीं, त्या अर्थीं तुला हद्दपार केलें जात आहे; हें राज्य सोडून तूं कायमचा चालता हो."

दुसऱ्या दिवशीं आणखी एक घोळका राजाकडे आला आणि त्या टेकड्यांपलीकडील सरदारणीच्या क्रौर्याबद्दल त्यांनीं फिर्याद दिली. आपणांला तिनें कसें विपत्तींत पाडिलें हेंहि त्यांनीं सांगितलें. ताबडतोब त्या सरदारणीला कचेरींत आणण्यांत आलें. राजानें तिलाहि हद्दपारीची शिक्षा ठोठावून म्हटलें, " जे आपल्या जमिनींची मशागत करतात आणि आपल्या मळ्यांची काळजी घेतात, ते लोक आपणांहून अधिक श्रेष्ठ आहेत. आपण ऐतखाऊ मंडळी त्यांनीं पिकविलेलें खातों आणि त्यांनीं काढिलेला द्राक्षमधु पितों. आणि ही गोष्ट तुला कळत नसल्यानें तूं या देशांतून चालती हो आणि या राज्यापासून दूर निघून जा."

पुन्हां कांहीं स्त्री-पुरुष आले आणि सांगूं लागले, " त्या धर्माध्यक्षानें आमच्याकडून मोठ-

मोठे दगड आणवून घेऊन देवालयाकरितां ते फोडून घेतले. आणि त्याची मजुरी मात्र त्यानें कांहींच दिली नाहीं. त्याची तिजोरी सोन्या-चांदीनें भरलेली असल्याचें आम्हांस माहीत आहे; आणि आम्ही मात्र इकडे भुकेनें व्याकुळ होऊन तडफडत आहोंत."

राजानें धर्माध्यक्षाला बोलावणें पाठविलें आणि जेव्हां धर्माध्यक्ष आला तेव्हां राजा त्याला म्हणाला, "आपल्या वक्षावर तूं जो हा क्रूस धारण करीत आहेस त्यायोगें जीवनाला जीवन दिलें गेलें पाहिजे. पण तूं तर जीवनापासून जीवनच हिरावून घेतलें आहेस आणि कांहींच दिलें नाहींस. म्हणून या राज्यांतून तूं चालता हो आणि येथें पुनः कधीं पाऊल टाकूं नकोस."

याप्रमाणें सबंध महिनाभर प्रत्येक दिवशीं आपल्याला होणाऱ्या जाचाबद्दल फिर्याद घेऊन स्त्री-पुरुष राजाकडे आले. आणि सबंध महिनाभर प्रत्येक दिवशीं कोणी ना कोणी जुलमी अरेराव त्या देशांतून हद्दपार केला गेला.

सादिक देशचे लोक विस्मित झाले, आणि त्यांचें हृदय आनंदानें भरून गेलें.

आणि एके दिवशीं वृद्ध आणि तरुण राजवाड्याभोंवतीं गोळा झाले आणि राजाला हांका मारूं लागले. तेव्हां एका हातांत आपला मुकुट आणि दुसऱ्या हातांत आपला राजदंड घेऊन राजा खालीं आला.

आणि तो त्यांना म्हणाला, " आतां माझ्याबद्दल तुमचें काय म्हणणें आहे ? बघा, ज्या वस्तू मीं धारण कराव्या असें तुम्हीं इच्छिलें होतें, त्या मी तुम्हांस परत करीत आहें."

पण ते ओरडले, " नाहीं, नाहीं; तुम्हीच आमचे खरेखुरे राजे आहांत. तुम्हीं या राज्यांतील सर्प ठेचून काढले आणि लांडग्यांचा नायनाट केला. आणि तुमचीं स्तुतिस्तोत्रें गाण्याकरितां आम्ही आलों आहोंत. हा मुकुट तुमच्या मस्तकावरच शोभून दिसतो आणि तो राजदंड तुमच्या हातांत असणेंच उचित आहे."

तेव्हां राजा उद्गारला, " छे, छे, राजा मी

नव्हे. तुम्ही स्वतःच राजे आहांत. जेव्हां तुम्हीं असें मानिलें, कीं मी दुर्बल आणि वाईट राज्यकर्ता होतों, तेव्हां खरोखर तुम्हीच दुर्बल आणि वाईट रीतीनें राज्यकारभार करणारे होतां. आणि आतां देशाची स्थिति चांगली आहे याला कारण म्हणजे तुमचीच इच्छा. मी म्हणजे केवळ तुम्हां सर्वांच्या मनांतील विचार, आणि तुमच्या क्रियेंतच माझें अस्तित्व. राज्य करणारा असा कोणी मनुष्य नसतोच. तर प्रजाच स्वतःवर राज्य करीत असते."

आणि आपला मुकुट आणि राजदंड यांनिशीं राजा परत आपल्या राजवाड्यांत गेला. आणि वृद्ध व तरुण संतुष्ट होत्साते आपापल्या मार्गांनीं गेले.

आणि तेव्हांपासून स्वतःविषयीं प्रत्येकाला वाटूं लागलें, कीं एका हातांत मुकुट आणि दुसऱ्या हातांत राजदंड धारण केलेले आपण राजेच आहोंत.

## न पुसणारे शब्द

एक मनुष्य दुसऱ्याला म्हणाला, "फार पूर्वी, समुद्राला भरती आली असतांना, माझ्या काठीच्या टोंकानें वाळूवर मीं एक ओळ लिहिली. ती वाचण्याकरितां लोक अजूनहि थांबतात; आणि ती कशानेंहि पुसून जाऊं नये म्हणून काळजी घेतात."

आणि दुसरा मनुष्य म्हणाला, "मींहि वाळूवर एक ओळ लिहिली होती, पण ती वेळ ओहोटीची होती; आणि अफाट समुद्राच्या लाटांनीं ती ओळ वाहून नेली. पण मला सांग, तूं काय लिहिलें होतेंस ?"

तेव्हां पहिल्या मनुष्यानें उत्तर दिलें, "मीं असें लिहिलें होतें : 'जें सनातन आहे, तेंच मी आहें.' पण तूं काय लिहिलें होतेंस ?"

आणि तो दुसरा मनुष्य उत्तरला, "मीं हें लिहिलें होतें : 'ह्या अनंत सागरांतला मी केवळ एक बिंदु आहें.'"

## तीन नजराणे

एके काळीं बेचर नामक शहरांत एक राजा होऊन गेला. त्याची सर्व प्रजा त्याच्यावर प्रेम करीत असे आणि त्याच्याविषयीं आदर बाळगीत असे.

पण त्या राजाविषयीं कटुता बाळगणारा आणि त्याची निंदा करण्याकरितांच आपली दूषित जीभ सदैव हालविणारा असा एक अत्यंत भिकारडा मनुष्य तेथें होता.

राजाला हें माहीत होतें, पण तो शांत होता.

पण अखेर राजानें त्याच्याविषयीं विचार ठरविला;

आणि एका कडाक्याच्या रात्रीं पिठाचें पोतें, साबणाची पिशवी आणि साखरेची रास घेऊन राजाचा एक नोकर त्या मनुष्याच्या दाराशीं आला;

आणि त्याला म्हणाला, "स्मृतिचिह्न म्हणून राजानें हे नजराणे आपणांकडे पाठविले आहेत."

हे नजराणे म्हणजे राजानें केलेला मुजराच होय, अशी कल्पना करून घेऊन तो मनुष्य

हर्षानें फुगून गेला. आपल्या गर्वाच्या धुंदींत तो बिशपाकडे गेला आणि राजानें केलेला आपला सन्मान त्यानें त्याला सांगितला. तो त्याला म्हणाला, " माझ्या कृपेची राजा कशी इच्छा करतो हें तुला दिसत नाहीं का ? "

पण बिशप म्हणाला, " वाहवा, राजा किती शहाणा आहे आणि तूं कसा अडाणी आहेस! तो लाक्षणिक अर्थानें बोलत आहे. तुझ्या खोल गेलेल्या पोटासाठीं त्यानें पीठ पाठविलें आहे; तुझ्या गलिच्छ त्वचेसाठीं साबणाचा उपयोग होईल; आणि साखरेनें तुझी कडू जीभ गोड होईल."

त्या दिवसापासून तो मनुष्य आपणा स्वतःलाहि बुजून जाऊं लागला. त्या राजाविषयींचा त्याचा द्वेष अधिकच भडकला; पण ज्यानें त्या राजाचें दर्शन त्यास घडविलें, त्या बिशपाचा तर त्याहूनहि अधिक द्वेष तो करूं लागला.

पण त्यानंतर मात्र त्यानें आपलें तोंड पुनः कधीं उघडलें नाहीं.

## शांतता आणि युद्ध

तीन कुत्रे रस्त्यावर ऊन खात आणि वार्तालाप करीत बसले होते.

स्वप्नांत बोलल्याप्रमाणें पहिला कुत्रा म्हणाला, " सध्यांच्या श्वानराज्यांत जन्म लाभणें हें खरोखर किती भाग्याचें आहे! ह्या काळांत आपणांला समुद्रांतून पर्यटन करतां येतें, पृथ्वीवरून प्रवास करतां येतो, इतकेंच नव्हे, तर आकाश-मार्गानेंहि आपण जाऊं शकतों, ही गोष्ट लक्षांत घ्या. आणि श्वानजातीला सुख लागावें, एवढेंच नव्हे, तर आपल्या डोळ्यांना, कानांना आणि नाकांना सुख व्हावें, म्हणून पुढें आलेल्या शोधांचा क्षणभर विचार करा."

आणि दुसरा कुत्रा म्हणाला, " कलांकडेहि सध्यां आपण अधिक लक्ष देत आहोंत. चंद्राकडे पाहून भुंकतांना आपल्या पूर्वजांपेक्षांहि अधिक तालबद्धतेनें आपण भुंकतों. आणि पाण्यांतील आपलें प्रतिबिंब जेव्हां आपण न्याहाळून बघतों,

तेव्हां आपली मुद्रा प्रतिदिनीं अधिकाधिक नितळ दिसते.''

यावर तिसरा कुत्रा म्हणाला, "पण मला सर्वांत अधिक चित्तवेधक आणि मनोहर गोष्ट वाटते ती ही कीं, सध्यां सर्व श्वानराज्यांत शांतियुक्त स्नेहभाव नांदत आहे.''

आणि त्याच क्षणीं त्यांनीं समोर बघितलें तों काय ! फासेपारधी त्यांच्याकडेच येत आहे !

त्या तिन्ही कुत्र्यांनीं पटापट उड्या मारल्या आणि रस्त्यांतून पळ काढला; आणि पळतां पळतां तिसरा कुत्रा म्हणतो, "चला, पळा; जीव घेऊन पळा ! संस्कृति आपला पाठलाग करीत आहे !''

## नृत्यांगना

बिरकाशाच्या राजाच्या दरबारीं एकदां एक नृत्यांगना आपल्या बजवय्यांसह आली. राजदरबारांत तिला प्रवेश मिळाला. वीणा आणि बांसरी यांच्या साथीवर राजासमोर तिनें नृत्य केलें.

तिनें ज्वालांचें नृत्य, तलवारींचें नृत्य आणि भाल्यांचें नृत्य केलें. तारका-नृत्य आणि आकाश-नृत्य यांचेहि प्रयोग तिनें करून दाखविले. आणि शेवटीं वाऱ्यावर डोलणाऱ्या फुलांचें नृत्य करून तिनें आपला कार्यक्रम संपविला.

त्यानंतर राजसिंहासनासमोर जाऊन राजाला तिनें मुजरा केला. तिला आणखी जवळ बोलावून राजानें म्हटलें, " हे सौंदर्यवती लावण्यलतिके, तुझी ही कला कोठून येते ? नृत्यांतील लयबद्धतेनुसार आणि कवनानुसार आपल्या सर्व अवयवांना खेळविण्याचें प्रभुत्व तुला कसें मिळालें ? "

आणि पुनः एकदां त्या नृत्यांगनेनें आपलें मस्तक राजापुढें नम्र केलें आणि ती उत्तरली,

" कृपावंत राजाधिराज, आपल्या प्रश्नांचीं उत्तरें मला ठाऊक नाहींत. मी केवळ एवढेंच जाणत्यें, कीं तत्त्वज्ञाचा आत्मा त्याच्या मस्तकांत वास करीत असतो, कवीचा आत्मा त्याच्या हृदयात असतो; गायकाचा आत्मा त्याच्या कंठांत कोठेंतरी असतो, पण नर्तिकेचा आत्मा तिच्या अवघ्या शरीराला व्यापून राहिलेला असतो."

## पहारा करणारे दोन देवदूत

एका सायंकाळीं नगराच्या वेशीजवळ दोन देवदूतांची भेट झाली. परस्परांना अभिवादन करून त्यांनीं संभाषण सुरू केलें.

एक देवदूत म्हणाला, "सध्यां तूं काय करीत असतोस, आणि कोणत्या कामावर तुझी नेमणूक झाली आहे?"

यावर दुसरा उत्तरला, "त्या गर्तेंत जीवन कंठीत असलेल्या एका महान् पापी आणि अत्यंत भ्रष्ट अशा अधःपतित मनुष्यावर पहारा करण्याचें काम मजकडे सोंपविण्यांत आलें आहे. मी तुला खात्रीपूर्वक सांगतों, कीं ही महत्त्वाची कामगिरी आहे आणि त्यामुळें मला फार कष्ट पडत आहेत."

पहिला देवदूत म्हणाला, "हें तर किती सोपें काम! पापी माणसें मीं पुष्कळ वेळां पाहिलीं आहेत आणि अनेकदां त्यांच्यावर पहाराहि केला आहे. पण आतां त्या पलीकडच्या लताकुंजांत

वास करीत असलेल्या एका चांगल्या साधूवर पहारा करण्याचें काम मजकडे आलें आहे. आणि मी तुला खात्रीनें सांगतों, कीं तें काम भयंकर कठिण आणि अत्यंत नाजुक आहे."

यावर दुसरा देवदूत म्हणतो, "हें केवळ काल्पनिक आहे. पापी मनुष्यावर पहारा करण्यापेक्षां साधूवर पहारा करणें अधिक कठिण कसें असूं शकेल ?"

पहिला उद्गारला, "केवढें औद्धत्य ! मी कल्पनावादी अं ! मीं केवळ सत्य तेंच सांगितलें. मला वाटतें, कीं तूंच कल्पनावादी आहेस !"

तदनंतर ते देवदूत हमरीतुमरीवर आले आणि प्रथम शब्दांनीं आणि अखेरीस आपल्या मुठींनीं आणि पंखांनीं परस्परांशीं लढूं लागले.

त्यांचें हें युद्ध चालू असतांनाच मुख्य देवदूत तेथें येऊन ठेपला. त्या दोघांना थांबवून तो म्हणाला, "तुम्ही कां लढतां आहांत ? आणि हें सर्व कशासाठीं ? पहारेकरी देवदूतांनीं नगराच्या वेशींत लढाई करणें अत्यंत अनुचित आहे हें

तुम्हांला माहीत नाहीं काय? तुमच्या वैमनस्याचें कारण मला सांगा."

तेव्हां दोन्ही देवदूतांनीं एकदम उत्तर दिलें. आपणाला दिलेलें काम अधिक कठिण आहे आणि म्हणून आपण अधिक बढती मिळण्याला पात्र आहोंत असा प्रत्येकाचा दावा होता.

मुख्य देवदूतानें आपलें मस्तक हालविलें आणि त्याच्या लक्षांत आलें.

त्यानंतर तो म्हणाला, "माझ्या मित्रांनो, सन्मान आणि पारितोषिक यांवर तुम्हां दोघांपैकीं कोणाचा अधिक हक्क आहे, हें मला आतांच सांगतां येणार नाहीं. पण तुम्हांत सलोखा नांदावा आणि तुम्हीं चांगले पहारेकरी व्हावें म्हणून तुमच्या कामांची माझ्या हातीं असलेल्या सत्तेनें मी अदलाबदल करीत आहें; कारण दुसऱ्याचें काम आपल्या कामापेक्षां अधिक सोपें असल्याचें तुम्ही आग्रहपूर्वक प्रतिपादीत आहांत. तर आतां जा, आणि आपापलें काम करून सुखी व्हा."

या आज्ञेनुसार ते देवदूत आपापल्या मार्गानें निघून गेले. पण त्यापैकीं प्रत्येक जण मागें वळून त्या मुख्य देवदूताकडे अधिकच रागानें बघत होता, आणि आपल्या हृदयांत म्हणत होता, "हे आमचे वरिष्ठ ! आम्हां देवदूतांचें जीवन हे प्रतिदिनीं अधिकाधिक कठिण करून सोडतात !"

पण तो मुख्य देवदूत तेथेंच उभा होता. त्यानें पुनः एकदां विचार केला आणि आपल्या हृदयांत तो म्हणाला, "आम्हीं खरोखर जागरूक राहिलें पाहिजे आणि आमच्या पहारेकरी देवदूतांवर लक्ष ठेविलें पाहिजे."

## मूर्ति

एकदां डोंगराळ प्रदेशांत एक मनुष्य रहात होता. त्याच्याजवळ प्राचीन शिल्पकारानें घडविलेली एक मूर्ति होती. त्याच्या दाराशीं ती मूर्ति पालथी पडली होती, पण त्या मनुष्याला त्याची कांहीं दादाहि नव्हती.

एके दिवशीं शहरांतला एक शहाणा मनुष्य त्याच्या घराजवळून चालला असतां त्यानें ती मूर्ति पाहिली; आणि ती विकायची कीं नाहीं याची तिच्या मालकाजवळ चौकशी केली.

तो मालक मोठ्यानें हंसून म्हणाला, "तो निस्तेज आणि घाणेरडा धोंडा कोण विकत घेऊं इच्छीत आहे तें सांगा."

तो शहरांतला मनुष्य म्हणाला, "त्या मूर्तीकरितां चांदीचें हें नाणें मी तुला देईन."

आणि तो मनुष्य आश्चर्यचकित आणि आनंदित झाला.

हत्तीच्या पाठीवरून ती मूर्ति शहरांत नेण्यांत

आली आणि नंतर अनेक महिन्यांनीं तो जंगली मनुष्य त्या शहरांत गेला; आणि तेथें रस्त्यांतून जात असतां एका दुकानासमोर खूप गर्दी जमलेली त्यानें पाहिली. एक मनुष्य मोठमोठ्यानें पुकारीत होता, " या हो या, आंत या; आणि अत्यंत सुंदर आणि जगांतील अत्यंत आश्चर्यकारक मूर्ति बघा. शिल्पकाराचें हें अद्भुत कौशल्य बघण्याकरितां चांदीचीं फक्त दोन नाणीं ! "

हें ऐकिल्यावर त्या जंगली मनुष्यानें चांदीचीं दोन नाणीं दिलीं आणि जी मूर्ति चांदीच्या एका नाण्यांत त्यानें स्वतःच विकली होती, ती बघण्या-साठीं तो त्या दुकानांत शिरला !

## अदलाबदल

एकदां एका आडवाटेवर दरिद्री कवीला एक मूर्ख श्रीमंत भेटला आणि त्यांचें संभाषण झालें. त्यांच्या सर्व संभाषणांतून त्यांचा केवळ असंतोषच प्रकट होत होता.

शेजारून एक दिक्पाल जात होता; त्यानें त्या दोघांच्या खांद्यांवर आपला हात ठेविला; आणि बघा, काय चमत्कार : आतां त्या उभयतांनीं आपापल्या स्वामित्वाची अदलाबदल केलेली आहे.

नंतर त्यांनीं एकमेकांचा निरोप घेतला. आणि सांगायला आश्चर्य वाटतें, कीं कवि डोळे उघडून बघतो तों घरंगळणाऱ्या कोरड्या वाळूशिवाय त्याच्या हातांत कांहींच नाहीं; आणि मूर्ख आपले डोळे मिटून पाहतो तों हालणाऱ्या मेघाशिवाय त्याच्या हृदयाला दुसरें कांहींच भासमान होत नव्हतें.

## प्रेम आणि तिरस्कार

एकं स्त्री एका पुरुषाला म्हणाली, "मी तुझ्यावर प्रेम करत्यें." आणि तो पुरुष म्हणाला, "तुझ्या प्रेमाला पात्र होण्यासारखें जें आहे, तें माझ्या हृदयांत आहे."

त्यावर त्या स्त्रीनें विचारलें, "तुझें माझ्यावर प्रेम नाहीं?" तेव्हां त्या पुरुषानें तिच्याकडे फक्त निरखून पाहिलें आणि तो स्तब्ध बसला.

तेव्हां ती स्त्री मोठ्यानें ओरडली, "मी तुझा तिरस्कार करत्यें." त्यावर तो पुरुष उद्गारला, "तर मग तुझ्या तिरस्काराला पात्र होण्याजोगें जें आहे, तेंहि माझ्या हृदयांत आहे."

## स्वप्नें

एका मनुष्याला एक स्वप्न पडलें. जागा झाल्यानंतर तो भविष्यवाद्याकडे गेला आणि आपल्या स्वप्नाचा उलगडा करून देण्याविषयीं त्यानें विनंति केली.

आणि तो भविष्यवादी त्याला म्हणाला, "आपल्या जागृतावस्थेंत पडणाऱ्या स्वप्नांकारितां मजकडे ये. त्यांचा अर्थ मी तुला सांगूं शकेन. पण तुझ्या निद्रितावस्थेंतील स्वप्नें हीं माझ्या ज्ञानाच्या आणि तुझ्या कल्पनाशक्तीच्या आटोक्याबाहेरचीं आहेत."

## पागल

पागलखान्याच्या बागेंत मला एक तरुण भेटला. म्लान, मोहक आणि विस्मयपूर्ण अशी त्याची मुद्रा होती.

त्याच्या शेजारीं बाकावर मी बसलों आणि म्हणालों, " तूं इकडे कोणीकडे ? "

आश्चर्यचकित दृष्टीनें त्यानें मजकडे पाहिलें आणि तो बोलूं लागला, " हा प्रश्न अयोग्य असला, तरी मी तुम्हांला सांगतों. आपणां स्वतः-सारखेंच मीं व्हावें अशी माझ्या वडिलांची इच्छा होती; माझ्या चुलत्यांनाहि तसेंच वाटत होतें. स्वतःच्या तेजस्वी पित्याची प्रतिमा माझ्यांत दिसावी असें माझी आई इच्छीत होती. माझ्या बहिणीला वाटत होतें, कीं उत्तम उदाहरण म्हणून दर्यापार गेलेल्या तिच्या नवऱ्याचें मीं अनुकरण करावें. माझ्या भावाला वाटतें, कीं मीं त्याच्या-सारखें उत्तम तालिमबाज व्हावें.

" आणि माझ्या गुरूंनींहि— तत्त्वज्ञ पंडितानें,

गायन-शिक्षकानें आणि नैयायिकानें— असेंच ठरविलें होतें; आणि प्रत्येकाची इच्छा होती, कीं आरशांतील त्याच्या रूपाचें मीं केवळ प्रतिबिंब बनावें.

" म्हणून या ठिकाणीं मी आलों आहे. येथें मला अधिक बरें वाटतें. निदान स्वत:सारखा तरी मी येथें असूं शकतों."

नंतर एकदम माझ्याकडे वळून तो म्हणाला, " पण मला सांगा, कीं शिक्षण आणि सदुपदेश यांमुळें तुम्हांलाहि या ठिकाणीं येणें भाग पडलें कीं काय ? "

आणि मी उत्तरलों, " नाहीं, मी आपला सहज बघण्याकरितां आलों आहें."

यावर तो म्हणाला, " अस्सें, तर मग या भिंतीपलीकडील पागलखान्यांत राहणाऱ्यांपैकीं तुम्ही आहांत ! "

## बेडकांचें संगीत

ग्रीष्म ऋतूंत एके दिवशीं एक बेडूक आपल्या दोस्ताला म्हणाला, "त्या किनाऱ्यावरील घरांत राहणाऱ्या लोकांना आपल्या रात्रीच्या संगीतामुळें त्रास होत असेल कीं काय, अशी मला भीति वाटते."

आणि त्याच्या दोस्तानें उत्तर दिलें, "बरें मग, दिवसां आपल्या बोलण्यानें आमच्या शांततेचा भंग करून ते आम्हांला उपद्रव देत नाहींत काय ?"

बेडूक म्हणाला, "पण रात्रीं आपण खूपच गात असतों, हें आम्हीं विसरतां कामा नये."

त्यावर त्याचा दोस्त उत्तरला, "आम्हीं हेंहि विसरतां कामा नये, कीं दिवसां ते खूप गप्पा ठोकतात आणि आरडाओरडा करतात."

बेडूक म्हणाला, "पण त्या मस्तवाल बेडका-विषयीं काय ? अपवित्र अशा आपल्या गर्जनेनें सगळ्या शेजाऱ्यांना तो भंडावून सोडीत असतो."

आणि त्याच्या दोस्तानें उत्तर दिलें, "खरें

आहे; पण जे मुत्सद्दी, उपाध्याय आणि शास्त्रज्ञ या तटांवर येऊन आपल्या बेताल कोलाहलानें येथलें वातावरण कोंदाटून टाकितात, त्यांच्याविषयीं तुझें काय म्हणणें आहे?"

त्यावर तो बेडूक म्हणाला, "ठीक आहे; पण ह्या मानवप्राण्यांपेक्षां आपण अधिक चांगलें होऊं या. आपलीं गीतें आपल्या हृदयांतच ठेवून रात्रीं आपण शांत राहूं या. मग आपल्या तालासाठीं चंद्र पुकारूं दे, नाहींतर आपल्या कवनासाठीं तारकांना हांका मारूं देत. कमींत कमी एकदोन रात्रीं किंवा तीन रात्रींहि आपण स्तब्ध राहूं या."

आणि त्याचा दोस्त म्हणाला, "ठीक आहे. मी मान्य करतों. तुझ्या उदार हृदयामुळें काय फळ मिळतें तें आपण पाहूं."

त्या रात्रीं ते बेडूक स्तब्ध होते; दुसऱ्या रात्रीं आणि पुनः तिसऱ्या रात्रींहि ते स्तब्ध राहिले.

पण सांगायला आश्चर्य वाटतें, कीं तिसऱ्या दिवशीं त्या तळ्याशेजारच्या घरांत राहणारी एक तोंडाळ बाई न्याहारीकरितां खालीं आली असतां

आपल्या नवऱ्यावर खेंकसली, "गेल्या तीन रात्रीं मला झोंप आली नाहीं. बेडकांचें तें डरॉंव् डरॉंव् ऐकून मला हमखास झोंप येत असे. पण कांहींतरी घोटाळा झालेला दिसतो; गेल्या तीन रात्रींपासून ते अगदीं गप्प आहेत; आणि झोंपेवांचून मी अगदीं वेडी झालें आहें."

त्या बेडकानें हें ऐकिलें आणि आपल्या दोस्ताकडे वळून डोळे मिचकावीत तो म्हणाला, "आणि आपल्या स्तब्धतेमुळें आपणहि अगदीं वेडे होऊन गेलों आहोंत, नव्हे का?"

आणि त्याचा दोस्त उत्तरला, "होय, रात्रीची शांतता आपणांला असह्य होत होती. आणि आपलें संगीत बंद करण्याला आतां मला कांहीं कारण दिसत नाहीं. स्वतःची शून्यता कोलाहलानेंच भरून काढण्याची आवश्यकता असणारांच्या सुखासाठीं आतां आपण आपलें संगीत सुरू करणेंच बरें."

आणि त्या रात्रीं चंद्र-तारकांनीं तालाकरिता आणि कवनाकरितां त्यांना मारिलेल्या हांका वायां गेल्या नाहींत!

## कायदे

फार पूर्वी एक राजा होऊन गेला. तो शहाणा होता. आपल्या प्रजेकरितां कायदे करण्याचें त्याच्या मनांत आलें.

भिन्न भिन्न अशा एक हजार कुलांतून एक हजार शहाण्या मंडळींना त्यानें आपल्या राजधानींत पाचारिलें आणि कायदे तयार करण्यास सांगितलें.

आणि हें सर्व घडून आलें.

पण चर्मपत्रावर लिहिलेले ते हजार कायदे जेव्हां राजासमोर ठेवण्यांत आले आणि राजानें जेव्हां ते वाचले, तेव्हां त्याच्या आत्म्याला अत्यंत दुःख झालें; कारण, आपल्या राज्यांत एक हजार प्रकारचे गुन्हे आहेत, हें त्याला माहीत नव्हतें.

त्यानंतर त्यानें आपल्या लेखकाला बोलाविलें, आणि सस्मित वदनानें स्वतःच सांगितलेले कायदे लिहून घेण्यास फर्माविलें. ते कायदे केवळ सातच झाले.

आणि ते एक हजार सुज्ञ रागावून राजाला सोडून गेले, आणि आपण तयार केलेल्या कायद्यां-निशीं आपल्या कुलांकडे परत आले; आणि प्रत्येक कुलानें आपल्यामधील सुज्ञांच्या कायद्यांचें पालन केलें.

म्हणून सध्यांच्या काळींहि त्यांच्यांत एक हजार कायदे अस्तित्वांत आहेत.

तो विस्तीर्ण देश आहे, पण त्याच्यांत एक हजार तुरुंग आहेत; आणि हजार कायद्यांचा भंग करणाऱ्या स्त्री-पुरुषांनीं ते तुरुंग भरून गेले आहेत.

तो खरोखर विस्तीर्ण देश आहे; पण तेथले लोक हे कायदे करणाऱ्या एक हजार लोकांचे आणि केवळ एकाच शहाण्या राजाचे वंशज आहेत.

## काल, आज आणि उद्यां

मीं माझ्या मित्राला म्हटलें, " त्या मनुष्याच्या बाहूवर रेलललेली ती बघ. अगदीं कालच माझ्या बाहूवर ती अशीच रेलली होती."

आणि माझा मित्र म्हणाला, " आणि उद्यां ती माझ्या बाहूवर रेलेल."

मीं म्हटलें, " ती बघ त्याला कशी लगटून बसली आहे. केवळ कालच ती मला लगटून बसली होती."

आणि त्यानें उत्तर दिलें, " उद्यां ती मजजवळ बसेल."

मीं म्हटलें, " बघ, त्याच्या प्याल्यांतलें मद्य ती पीत आहे, आणि काल माझ्या प्याल्यांतलें ती प्यायली होती."

आणि तो म्हणाला, " उद्यां माझ्या प्याल्यांतलें ती पिईल."

नंतर मीं म्हटलें, " प्रेमानें आणि वश होणाऱ्या नेत्रांनीं ती त्याच्याकडे कशी टक लावून

पहात आहे बघ. काल ती माझ्याकडे अशीच टक लावून बघत होती."

आणि माझा मित्र म्हणाला, " उद्यां ती मज-कडे टक लावून पाहील."

मीं म्हटलें, " त्याच्या कानांत तिनें गुणगुण-लेलीं प्रेमगीतें तुला ऐकूं येत नाहींत का? काल तींच प्रेमगीतें ती माझ्या कानाशीं गुणगुणली."

आणि माझा मित्र म्हणाला, " उद्यां तीं माझ्या कानांत ती गुणगुणेल."

मीं म्हटलें, " अरे, बघ तरी; ती त्याला आलिंगन देत आहे. केवळ कालच तिनें मला आलिंगिलें होतें."

आणि माझा मित्र म्हणाला, " ती मला उद्यां आलिंगन देईल."

तेव्हां मीं म्हटलें, " किती विलक्षण स्त्री ! "

पण तो उत्तरला, " जीवनाप्रमाणें ती सर्व मानवांना वश होते; मृत्यूप्रमाणें सर्व मानवांना ती जिंकून घेते; आणि अनंततेप्रमाणें सर्व मानवांना ती आलिंगन देते."

## तत्त्वज्ञानी आणि चांभार

एक तत्त्वज्ञानी फाटलेल्या पायतणांनिशीं चांभाराच्या दुकानांत आला, आणि त्याला म्हणाला, "माझीं पायतणें कृपा करून दुरुस्त करून दे."

त्यावर तो चांभार म्हणाला, "दुसऱ्या एक-जणाचीं पायतणें मी आतां दुरुस्त करीत आहें. आणि दुसऱ्याहि कांहीं पायतणांना मला ठिगळें द्यायचीं आहेत. तुमचें काम त्यानंतर मी घेऊं शकेन. पण तुमचीं पायतणें येथें ठेवा आणि आजच्या दिवस हीं दुसरीं वापरून तुमच्या पायतणांकरितां उद्यां या."

तेव्हां तो तत्त्वज्ञानी क्रुद्ध झाला आणि म्हणाला, "माझ्या स्वतःच्या पायतणांशिवाय इतर पायतणें मी वापरीत नसतों."

आणि तो चांभार म्हणाला, "ठीक तर, तुम्ही खरेखुरे तत्त्वज्ञानी आहांत, आणि दुसऱ्याच्या पायतणांनीं स्वतःचे पाय आच्छादूं शकत नाहीं.

याच रस्त्यावर दुसरा एक चांभार आहे आणि तो माझ्यापेक्षां अधिक चांगल्या तऱ्हेनें तत्त्वज्ञानी लोकांस ओळखतो. दुरुस्तीकरतां तुम्ही त्याच्याकडेच गेलेलें बरें ! ”

## पूल आणि खेंचर

समुद्राला मिळावयास जाणाऱ्या ॲसी नदीनें ॲंटिओच शहराचे दोन भाग पाडिल्यामुळें ते जोडण्याकरितां त्या नदीवर एक पूल बांधण्यांत आला होता. ॲंटिओचमधील खेंचरांच्या पाठीवरून डोंगरांमधून वाहून आणिलेल्या धोंड्यांनीं त्या पुलाचें बांधकाम झालें होतें.

पुलाचें काम पूर्ण झालें तेव्हां त्याच्या एका स्तंभावर ग्रीक भाषेंत आणि सीरियाच्या प्राचीन भाषेंत खोदून ठेविण्यांत आलें: "दुसऱ्या ॲंटिओचस राजानें हा पूल बांधिला."

आणि त्या रम्य ॲसी नदीवरील त्या सुखदायी पुलावरून लोक जाऊं-येऊं लागले.

आणि एका सायंकाळीं थोडासा वेडसर मानला गेलेला एक तरुण त्या स्तंभावरून खालीं उतरून त्या खोदलेल्या शब्दांजवळ गेला आणि त्या खोदकामावर कोळसा फासून त्यावर त्यानें लिहून ठेविलें, "या पुलाचे दगड डोंगरांतून

खेंचरांकडून येथें आणिले गेले होते. म्हणून या पुलावरून इकडेतिकडे जातांना तो बांधणाऱ्या ॲंटिओचमधील खेंचरांच्या पाठीवरच तुम्ही स्वार होत असतां ! ''

आणि त्या तरुणानें लिहिलेलें लोकांनीं जेव्हां वाचिलें, तेव्हां त्यांच्यांतील कांहीं जणांना हंसूं आलें आणि कांहीं जणांना आश्चर्य वाटलें. आणि कांहीं जण म्हणाले, " वा: ठीक, हें कोणाचें काम तें आम्हांला माहीत आहे. तो जरासा वेडपट नाहीं का ? ''

पण एक खेंचर दुसऱ्या खेंचराला हंसून म्हणालें, " ते दगड आपणच वाहून आणिले होते हें तुला आठवतें ना ? आणि तरीहि आतांपर्यंत असेंच म्हटलें जात होतें, कीं हा पूल ॲंटिओचस राजानें बांधिला आहे !''

## झादचें मैदान

झादच्या रस्त्यावर एका प्रवाशाला शेजारच्याच खेडयांतला एक मनुष्य भेटला. एका विस्तीर्ण मैदानाकडे हात दाखवून प्रवाशानें त्या मनुष्यास विचारिलें, " आलॅम राजानें आपल्या शत्रूवर विजय मिळविलेलें रणक्षेत्र तें हेंच ना ? "

आणि त्या मनुष्यानें उत्तर दिलें, " हें कधींच रणक्षेत्र नव्हतें. या मैदानावर एके काळीं झाद नांवाचें भव्य शहर वसलें होतें, पण तें जळून खाक झालें. तथापि तें आतां छान मैदान झालें आहे, होय कीं नाहीं ? "

इतकें बोलून त्यांनीं परस्परांचा निरोप घेतला.

अर्ध्या मैलाच्या आंतच त्या प्रवाशाला दुसरा एक मनुष्य भेटला, आणि पुनः तें मैदान दाखवून तो म्हणाला, " म्हणजे त्या ठिकाणीं एकदां भव्य झाद शहर वसलें होतें तर ? "

त्यावर तो मनुष्य म्हणाला, " या जागेवर शहर केव्हांच नव्हतें. येथें एक मठ मात्र होता, पण

दक्षिण-देशच्या लोकांनीं तो उध्वस्त करून टाकिला."

त्यानंतर थोड्या वेळानें झाडच्या त्याच रस्त्यावर प्रवाशाला तिसरा मनुष्य भेटला; आणि पुनः एकदां तें विस्तीर्ण मैदान दाखवीत तो म्हणाला, "या ठिकाणीं एक भव्य मठ उभा होता हें खरें ना?"

पण त्या मनुष्यानें उत्तर दिलें, "याच्या आसपास मठ असा कधींच नव्हता. पण या मैदानावर एक प्रचंड उल्का पडली असल्याचें आमच्या वाडवडिलांनीं आम्हांला सांगितलें आहे."

तेव्हां आपल्या हृदयांत आश्चर्य करीत तो प्रवासी पुढें निघाला. तों एक अत्यंत वृद्ध गृहस्थ त्याला भेटला. त्याला अभिवादन करून तो म्हणाला, "महाराज, आजूबाजूस रहात असलेले तिघे जण मला या रस्त्यावर भेटले. त्यांच्यापैकीं प्रत्येकाला या मैदानाविषयीं मीं विचारलें; पण प्रत्येकानें दुसऱ्याचें म्हणणें अमान्य केलें आणि इतरांनीं कोणीहि न सांगितलेली नवी गोष्ट प्रत्येकानें मला सांगितली."

तेव्हां आपलें मस्तक वर करून तो वृद्ध उत्तरला, “ माझ्या मित्रा, त्यांच्यापैकीं प्रत्येक जणानें जें खरोखर होतें, तेंच तुला सांगितलें; पण या निरनिराळ्या हकिकतींत अधिक भर घालून त्यांचें पूर्ण सत्य बनविण्याला आमच्या-पैकीं फारच थोडे लोक लायक आहेत.”

## सोन्याचा कमरपट्टा

एके दिवशीं दोघा जणांची रस्त्यावर गांठ पडली. ते दोघेमिळून सलामिस शहराकडे चालत निघाले होते. तिसऱ्या प्रहरीं ते एका प्रशस्त नदीजवळ येऊन पोंचले, तों नदीपार जायला तेथें पूल नाहीं. त्यांना पोहून जाणें अथवा स्वतःस माहीत नसलेला दुसरा एकादा मार्ग शोधून काढणें भाग होतें.

आणि ते परस्परांना म्हणाले, " आपण पोहून जाऊं या. नदीचें पात्र तसें कांहीं फार मोठें नाहीं." आणि पाण्यांत उड्या टाकून ते पोहूं लागले.

त्यांच्यापैकीं एक जणाला नद्यांची आणि नद्यांच्या वळणांची चांगली माहिती होती; पण प्रवाहाच्या मधोमध गेल्यावर एकाएकीं त्याचें अवसान सुटलें आणि जोरदार प्रवाहाबरोबर तो वहात चालला. उलट, ज्याला पूर्वीं कधींहि पोहणें माहीत नव्हतें त्यानें सरळ नदी ओलांडली आणि पलीकडल्या तीरावर जाऊन तो उभा राहिला. पण आपला

सहकारी अजूनहि प्रवाहाशीं झुंजत आहे असें पाहून त्यानें पुन: पाण्यांत उडी मारिली आणि त्याला सुखरूपपणें तीरावर आणिलें.

आणि प्रवाहाबरोबर वहात चाललेला तो मनुष्य म्हणाला, “ पण तूं तर मला सांगितलें होतें, कीं तुला पोहतां येत नाहीं. मग इतक्या विश्वासपूर्वक तूं नदी कशी ओलांडलीस ? ”

आणि त्या दुसऱ्या मनुष्यानें उत्तर दिलें, “ माझ्या मित्रा, मीं बांधिलेला हा कमरपट्टा तुला दिसतो ना ? सोन्याच्या मोहरांनीं हा भरलेला आहे. माझ्या बायका-पोरांकरितां एक वर्षाची बेगमी म्हणून ह्या मोहोरा मीं मिळविल्या आहेत. या कमरपट्ट्याच्या भारानेंच मला नदीपार केलें आणि माझ्या बायका-मुलांकडे आणिलें. मी पोहत असतांना माझीं बायका-मुलें माझ्या खांद्यांवर होतीं.”

आणि ते दोघे बरोबरच सलामिसकडे चालूं लागले.

## तांबडी भूमि

एक वृक्ष मनुष्याला म्हणाला, “ माझीं मुळें तांबड्या भूमींत खोलवर गेलेलीं आहेत, आणि मी माझीं फळें तुला देईन.”

आणि तो मनुष्य त्या वृक्षाला म्हणाला, “ आपणांत किती साम्य आहे ! माझीं मुळेंहि तांबड्या भूमींत खोलवर गेलेलीं आहेत. तुझीं फळें तूं मला अर्पण करावीं म्हणून ती तांबडी भूमि तुला शक्ति देत आहे, आणि तुझ्यापासून मीं तीं स्वीकारावीं असें मला शिकवीत आहे.”

## पूर्णिमेचा चंद्र

पूर्णिमेचा चंद्र नगरांत वैभवानें उदयास आला, आणि त्याच्याकडे पाहून नगरांतल्या सर्व कुत्र्यांनीं भुंकावयास प्रारंभ केला.

केवळ एकच कुत्रा भुंकत नव्हता. गंभीर स्वरांत तो इतरांना म्हणाला, "स्तब्धतेला तिच्या झोपेंतून उठवूं नका. तुमच्या भुंकण्यानें तुम्ही कांहीं चंद्राला खालीं पृथ्वीवर आणूं शकणार नाहीं."

तेव्हां भयाण शांततेंत त्या सर्व कुत्र्यांनीं आपलें भुंकणें थांबविलें; पण त्या उपदेश करणाऱ्या कुत्र्यानें मात्र शांततेसाठीं साऱ्या रात्रभर भुंकणें चालू ठेविलें!

## वानप्रस्थ द्रष्टा

एकदां एक वानप्रस्थ द्रष्टा होऊन गेला. महिन्यांतून तीनदां तो त्या मोठ्या शहरांत जात असे आणि बाजारपेठांतून दानाचा आणि विभागणीचा उपदेश लोकांना करीत असे. त्याच्या वाक्पांडित्यानें सर्वत्र त्याची कीर्ति पसरली होती.

एका सायंकाळीं त्याच्या पर्णकुटींत तिघे जण आले असतां त्यानें त्यांचें क्षेम विचारलें. आणि ते म्हणाले, " दानाचा आणि विभागणीचा उपदेश तुम्ही करीत आलां आहांत. गरिबांना देण्याकरितां ज्यांच्याजवळ भरपूर आहे अशाच लोकांना तुम्हीं ती शिकवण दिली आहे. आणि तुमच्या कीर्तीमुळें तुम्हांला संपत्ति मिळाली असली पाहिजे यांत आम्हांला शंका नाहीं. तर आतां आम्हांला गरज असल्यामुळें तुमची ती संपत्ति आम्हांला देऊन टाका."

आणि तो वानप्रस्थ उत्तरला, " माझ्या मित्रांनो, हा बिछाना, ही चटई आणि पाण्याचा हा खुजा

यांशिवाय मजजवळ दुसरें कांहींच नाहीं. तुमची इच्छा असेल तर हें सर्व घेऊन जा. माझ्याजवळ सोनें-चांदी मुळींच नाहीं."

त्यावर त्याच्याकडे त्यांनीं तिरस्कारानें बघितलें आणि ते माघारीं वळले आणि शेवटचा मनुष्य दाराशीं क्षणभर थांबला आणि उद्गारला, "अरे विश्वासघातकी ठका! आपणां स्वतःला जें आचरितां येत नाहीं तें तूं शिकवितोस आणि उपदेशितोस!"

## पुरातन मद्य

एकदां एक धनाढ्य मनुष्य होऊन गेला. आपल्या तळघराचा आणि त्यांतल्या मद्याचा त्याला यथार्थ अभिमान होता. आणि पुरातन अशा द्राक्षमद्याची एक सुरई कांहीं विशेष प्रसंगा-करितां तेथें राखून ठेवण्यांत आली होती. तो विशेष प्रसंग फक्त त्याला एकट्यालाच माहीत होता.

त्या संस्थानचा गव्हर्नर त्याच्या भेटीला आला तेव्हां स्वतःशीं विचार करून तो म्हणाला, "केवळ एका गव्हर्नराकरितां ती सुरई उघडतां कामा नये."

त्या भागांतला बिशप त्याच्याकडे आला तेव्हां तो स्वतःशींच म्हणाला, "छे, ती सुरई मी उघडणार नाहीं. त्या मद्याची किंमत याला कळणार नाहीं, आणि त्याचा स्वादहि याच्या नाकपुड्यांपर्यंत पोंचणार नाहीं."

त्या राज्याचा राजा आला आणि त्यानें त्या

धनाढ्य मनुष्याबरोबर रात्रींचें जेवण केलें. पण त्याला वाटलें, " केवळ एका राजाकरितां हें मद्य काढणें हें फारच बडेजावाचें होईल."

आणि स्वतःच्या पुतण्याच्या लग्नदिनींहि तो आपल्याशीं म्हणाला, " छे, या पाहुणेमंडळी-साठीं ती सुरई काढतां उपयोगी नाहीं."

त्यानंतर कित्येक वर्षें लोटलीं आणि तो मनुष्य वृद्ध होऊन मरण पावला. आणि प्रत्येक बीजाप्रमाणें आणि ओकवृक्षाच्या फळाप्रमाणें त्याला पुरून टाकण्यांत आलें.

आणि त्याच्या अंत्यविधीच्या दिवशीं मद्याच्या इतर सुरयांबरोबर ती पुरातन मद्याची सुरईहि बाहेर काढण्यांत आली आणि शेजारच्या ग्रामस्थांनीं तिचा आस्वाद घेतला. पण तिचें पुरातनत्व कोणालाच भासमान झालें नाहीं!

त्यांच्या दृष्टीनें प्याल्यांत ओतलेलें सारें केवळ एकाच प्रकारचें मद्य होतें!

## दोन कविता

अनेक शतकांपूर्वीं अथेन्सकडे जाणाऱ्या एका रस्त्यावर दोन कवींची भेट झाली आणि परस्परांच्या भेटीनें त्यांना आनंद झाला.

आणि एका कवीनें दुसऱ्याला विचारलें, "अगदीं अलीकडे तूं काय रचिलें आहेस आणि तुझ्या वीणेवर तें कसें काय बसलें आहे?"

आणि दुसऱ्या कवीनें गर्वानें उत्तर दिलें, "मीं माझी प्रदीर्घ कविता नुकतीच पूर्ण केली आहे. कदाचित्, सबंध ग्रीक-वाङ्मयांतली हीच प्रदीर्घ कविता असेल. त्या कवितेंत सर्वश्रेष्ठ झ्यूसदेवाचें आवाहन करण्यांत आलें आहे."

त्यानंतर आपल्या पायघोळ अंगरख्याखालून एक चर्मपत्र काढून तो म्हणाला, "ही बघ, मजजवळ ती आहेच; आणि ती मी तुला आनंदानें वाचून दाखवितों. चल, त्या शुभ्र सुरूच्या सांवलीखालीं आपण बसूं."

आणि त्या कवीनें आपली कविता वाचून दाखविली. खरोखर, ती लांबलचक कविता होती.

आणि पहिला कवि करुणभावानें म्हणाला, " ही महान् कविता आहे. युगानुयुगें ही टिकून राहील आणि तिच्यामुळें तुझा जयजयकार होईल."

त्यानंतर दुसरा कवि शांत चित्तानें म्हणाला, " पण इतके दिवस तूं काय लिहीत होतास ? "

आणि पहिल्या कवीनें उत्तर दिलें, " मीं फारच थोडें लिहिलें आहे. बगीच्यांत खेळणाऱ्या बालकाच्या स्मृतीदाखल केवळ आठ ओळी ! " आणि त्या ओळी त्यानें म्हणून दाखविल्या.

दुसरा कवि म्हणाला, " ठीक आहेत; इतक्या कांहीं वाईट नाहींत."

आणि त्यांनीं परस्परांचा निरोप घेतला.

आणि आतां दोन हजार वर्षांनंतर त्या पहिल्या कवीच्या आठ ओळी प्रत्येकाच्या

जिभेवर खेळत आहेत; त्या लोकप्रिय झाल्या असून त्यांचें संगोपन केलें जात आहे.

आणि ती दुसरी कविता ग्रंथालयांतून आणि विद्वानांच्या कपाटांतून युगानुयुगें टिकून राहिली असली, आणि तिचें स्मरण कायम राहिलें असलें, तरी ती कोणालाच प्रिय झाली नाहीं आणि कोणाकडून वाचिली गेली नाहीं.

## दया

एकदां एका हिरव्यागार टेकडीवर एकाकीच उभें असलेलें एक पांढरें शुभ्र घर तीन माणसांनीं दुरून पाहिलें. त्यांच्यापैकीं एक जण म्हणाला, " तें दयाबाईचें घर आहे. ती थेरडी चेटकी आहे."

दुसरा मनुष्य म्हणाला, " तूं चुकत आहेस. तेथें राहून आपल्या स्वप्नांची प्रतिष्ठापना करीत असलेली दयादेवी ही एक सुंदर स्त्री आहे."

तिसरा मनुष्य म्हणाला, " तुम्ही दोघेहि चुकतां आहांत. दयाबाई ही या विशाल प्रदेशाची मालकीण आहे, आणि आपल्या गुलामांचें ती रक्तशोषण करीत असते."

अशा रीतीनें दयादेवीबद्दल चर्चा करीत ते पुढें चालूं लागले.

जेव्हां बाजूच्या एका रस्त्याजवळ ते आले, तेव्हां एक वृद्ध गृहस्थ त्यांना भेटला. आणि

त्यांच्यापैकीं एकानें त्यास विचारलें, " त्या टेकडीवरील पांढऱ्या शुभ्र घरांत राहणाऱ्या दया-देवीविषयीं कृपा करून आपण आम्हांला कांहीं सांगूं शकाल काय ? "

आणि त्या वृद्ध गृहस्थानें आपलें मस्तक वर केलें आणि त्यांच्याकडे पाहून हंसून तो म्हणाला, " मी नव्वद वर्षांचा झालों आहे ; आणि मी मुलगा होतों त्या वेळीं दयादेवी असल्याचें मला आठवतें. पण ऐशीं वर्षांपूर्वीच दयादेवी मेली असून आतां तें घर रिकामें पडलें आहे. त्यांत कधीं कधीं घुबडांचा घूत्कार चाललेला असतो ; आणि लोक म्हणतात, कीं ती जागा भुतानें झपाटलेली आहे."

## उंदीर आणि मांजर

एकदां सायंकाळीं एका कवीला शेतकरी भेटला. तो कवि तुटक वृत्तीचा होता आणि शेतकरी लाजाळू होता, तरीहि त्यांचें संभाषण झालें.

आणि तो शेतकरी म्हणाला, "फार पूर्वीं ऐकिलेली एक छोटीशी गोष्ट मी तुम्हांला सांगतों. एक उंदीर सांपळ्यांत सांपडला. त्या सांपळ्यांत ठेविलेला चक्का तो सुखानें खात असतां एक मांजर तेथें उभें ठाकलें. क्षणभर तो उंदीर घाबरला, पण सांपळ्यांत आपण सुरक्षित आहोंत हें त्यानें ओळखलें.

"तेव्हां तें मांजर म्हणालें, 'माझ्या मित्रा, तुझें हें शेवटचेंच भोजन तूं करीत आहेस.'

"'होय', तो उंदीर उत्तरला, 'मला काय, एक जन्म असल्यामुळें एक मरण! पण तुझ्या-विषयीं काय? मला त्यांनीं सांगितलें आहे, कीं तुला नऊ जन्म आहेत. त्याचा अर्थ असा नाहीं का, कीं तुला नऊ वेळां मरावें लागणार आहे?'"

नंतर त्या शेतकऱ्यानें कवीकडे पाहिलें आणि म्हटलें, " ही विलक्षण गोष्ट नाहीं का ? "

परंतु त्या कवीनें त्याला कांहीं उत्तर दिलें नाहीं आणि तो निघून गेला. पण जातांना आपल्या हृदयांत तो म्हणत होता, " खात्रीनें नऊ जन्म, आम्हांला नऊ जन्म आहेत हें निश्चित. आणि नऊ वेळां मरण, नऊ वेळां आम्ही मरूं. पिंजऱ्यांत पकडलें जाणारें एकच जीवन— शेवटच्या भोजनासाठीं चकऱ्याच्या तुकड्यावर समाधान मानणारें शेतकऱ्याचें जीवन— या नऊ जन्मांपेक्षां कदाचित् अधिक बरें असेल. तथापि, अरण्यांतील आणि मैदानावरील सिंहांचे आम्ही आप्त आहोंत, नव्हे का ? "

## शाप

समुद्रावरचा एक वृद्ध मनुष्य एकदां मला सांगत होता, "तीस वर्षांपूर्वी एक खलाशी माझ्या मुलीला घेऊन पळून गेला होता. म्हणून माझ्या हृदयांत मीं त्या दोघांनाहि शाप दिला. कारण, साऱ्या जगापेक्षांहि माझें तिच्यावर अधिक प्रेम होतें.

"त्यानंतर थोड्याच काळांत त्या तरुण खलाशाला त्याच्या जहाजासह समुद्रांत जलसमाधि मिळाली. आणि त्याच्याबरोबर माझी सुंदर मुलगीहि बुडाल्यामुळें मला कायमची अंतरली.

"म्हणून आतां एक तरुण आणि एक कुमारी यांचा खुनी तुम्हांला माझ्यांत दिसत आहे. माझ्या शापामुळेंच त्यांचा निःपात झाला. आणि आतां मृत्यूच्या दारीं जात असतांना मी परमेश्वराच्या क्षमेची याचना करीत आहें."

तो मनुष्य असें म्हणाला खरा. पण त्याच्या शब्दांत आत्मप्रौढीची छटा होती, आणि आपल्या शापाच्या सामर्थ्याबद्दल अजूनहि त्याला अभिमान वाटत असावा असें दिसत होतें.

## पांसष्टावी कला

एका मनुष्याच्या बागेंत डाळिंबाचीं बरींच झाडें होतीं. अनेक शरदृतूंत आपलीं डाळिंबें रौप्य-तबकांत घालून आपल्या घराबाहेर तो ठेवीत असे. त्या तबकांवर त्यानें स्वतःच लिहिलेले फलक टांगलेले असत. त्यांवर लिहिलें होतें, "कांहींतरी देऊन एक घ्या. तुम्हांला पूर्ण मुभा आहे."

पण लोक तसेच पुढें जात असत आणि एकहि फळ कोणी घेत नसे.

तेव्हां त्या मनुष्यानें स्वतःशींच विचार केला, आणि एका शरदृतूंत तीं डाळिंबें रौप्य-तबकांत घालून आपल्या घराबाहेर ठेविण्याचें त्यानें बंद केलें. आणि त्याऐवजीं ठळक अक्षरांत लिहिलेला एक फलक त्यानें तेथें लाविला : "आमच्या बागेंतलीं उत्कृष्ट डाळिंबें येथें मिळतील; पण इतर कोठल्याहि डाळिंबांपेक्षां अधिक किंमत पडेल."

आणि आतां बघा, तीं विकत घेण्यासाठीं शेजारच्या स्त्री-पुरुषांनीं एकच गर्दी करून सोडिली!

## देव एक कीं अनेक ?

किलाफिस नामक शहरांत मंदिराच्या पायऱ्यावर एक हेत्वाभासपटु उभा राहिला आणि त्यानें अनेक देव असल्याचें प्रतिपादिलें. आणि लोक आपल्या मनांत म्हणाले, "आम्हांला हें सगळें माहीत आहे. ते देव आमच्याबरोबरच रहात नाहींत का ? आणि आम्ही जेथें जेथें जातों तेथें तेथें आमच्या मागून येत नाहींत का ?"

नंतर थोड्याच दिवसांत दुसरा एक मनुष्य बाजारपेठेंत उभा राहून लोकांना सांगूं लागला, "परमेश्वर मुळीं नाहींच." आणि ऐकणाऱ्या लोकांना त्याच्या या बातमीमुळें आनंद वाटला; कारण, देवांची त्यांना भीति वाटत होती.

आणि दुसऱ्या एका दिवशीं एक प्रभावशाली वक्ता तेथें आला आणि सांगूं लागला, "परमेश्वर केवळ एकच आहे." आणि आतां लोक भयभीत होऊन गेले; कारण, अनेक देवांच्या न्याय-

निवाड्यापेक्षां एका देवाच्या न्यायनिवाड्याची त्यांना आपल्या अंतःकरणांत भीति वाटत होती.

त्याच वेळीं पुनः दुसरा एक मनुष्य आला आणि लोकांना सांगूं लागला, "एकंदर तीन देव आहेत, आणि एकाच स्वरूपांत ते वायूवर राहतात. त्यांना एक मोठी आणि दयाळू आई असून तीच त्यांची सोबतीण आणि बहीण आहे."

हें ऐकल्यावर प्रत्येकाला हायसें वाटलें. मनांतल्या मनांत ते म्हणाले, "एकाच स्वरूपांत असणाऱ्या तीन देवांचें आमच्या अपराधांबाबत एकमत होणें अशक्यच आहे; आणि शिवाय, त्यांची ती दयाळू माता आम्हां दुर्बल पामरांबद्दल खात्रीनें रदबदली करील."

आणि किलाफिस शहरांत अगदीं आजहि असे लोक आहेत, कीं जे देवांचें असंख्यत्व आणि नास्तित्व, एक देव आणि एकाच स्वरूपांत असणारे तीन देव, आणि देवांची ती दयाळू माता यांच्याविषयीं आपापसांत हमरीतुमरीवर येऊन वादविवाद करीत असतात.

## बहिरी बायको

एकदां एक श्रीमंत मनुष्य होऊन गेला. त्याची पत्नी तरुण पण ठार बहिरी होती.

आणि सकाळच्या न्याहरीच्या वेळीं ती त्याला म्हणाली, "काल मी बाजारपेठेंत गेलें होतें तों तेथें दमास्कसचीं रेशमी वस्त्रें, हिंदुस्थानची मलमल, पर्शियामधील कंठे आणि येमानमधील बांगड्या यांचें प्रदर्शन भरलें होतें. मला वाटतें, सौदागरांच्या काफल्यानें या वस्तू नुकत्याच आपल्या शहरांत आणिल्या असाव्यात. आणि माझ्या लक्तरांकडे तरी बघा! केवळ म्हणायला श्रीमंताची बायको! त्या सुंदर सुंदर वस्तूंपैकीं कांहीं वस्तू मला हव्यात."

अजूनहि कॉफी पीत असलेला तिचा पति तिला म्हणाला, "लाडके, त्या प्रदर्शनांत जाऊन तूं हव्या त्या वस्तू खरेदी करायला माझी कांहींच हरकत 'नाहीं.'"

आणि ती बहिरी स्त्री म्हणाली, "'नाहीं!'

तुम्ही नेहमींच 'नाहीं, नाहीं' म्हणत असतां ! तुमच्या संपत्तीला आणि माझ्या मंडळींना लाज आणण्यासाठीं आपल्या मित्रपरिवारांत या फट-कुरांनिशींच मला वावरायला हवें का ?"

त्यावर पति म्हणाला, "मी 'नाहीं' असें म्हणालों नाहीं. तूं खुशाल बाजारपेठेंत जा आणि आपल्या शहरांत आलेल्या वस्तूंतून अत्यंत सुंदर पोषाक आणि रत्नें विकत घे."

आणि त्याचे शब्द ऐकण्यांत त्या स्त्रीची पुनः चूक झाली. ती म्हणाली, "तुम्ही सगळे श्रीमंत म्हणजे पक्के चिक्कू ! माझ्या बरोबरीच्या स्त्रिया मूल्यवान् पोषाक करून शहरांतील बगीच्यांत फिरायला जातात आणि तुम्ही मात्र सुंदर आणि रमणीय वस्तू मला नाकारतां."

आणि तिच्या डोळ्यांतून गंगा-यमुना सुरू झाल्या. आणि तिच्या वक्षावर अश्रू गळत असतां ती पुनः ओरडली, "पोषाक किंवा रत्न मला हवें असतें, तेव्हां नेहमीं तुम्ही 'नको नको' म्हणत असतां !"

तेव्हां तो पति द्रवला. तो उठला आणि आपल्या पिशवींतून मूठभर सोन्याच्या मोहोरा काढून त्यानें त्या तिच्यापुढें ठेविल्या; आणि ममतेच्या स्वरांत तो म्हणाला, "लाडके, बाजार-पेठेंत जा आणि तुला हवें असेल तें विकत घे."

त्या दिवसापासून पुढें केव्हांहि कांहीं हवें असल्यास ती तरुण बहिरी स्त्री आपल्या डोळ्या-तील मोत्यासारख्या आंसवांनिशीं आपल्या पतीपुढें जात असे, आणि तो कांहीं न बोलतां मूठभर सोन्याच्या मोहोरा काढून त्या तिच्या पदरांत घालीत असे.

पण आतां असें झालें, कीं ती तरुण स्त्री लांबलांबच्या प्रवासांची चटक लागलेल्या एका तरुणाच्या प्रेमपाशांत सांपडली; आणि जेव्हां जेव्हां तो बाहेरगांवीं असे, तेव्हां तेव्हां आपल्या गवाक्षांत ती अश्रू ढाळीत बसे.

तिचा पति तिला अश्रू ढाळीत असतांना जेव्हां बघे, तेव्हां तो आपल्या हृदयांत म्हणत

असे, “ सौदागरांचा नवा काफला आला असला पाहिजे, आणि त्यानें रेशमी वस्त्रें आणि दुर्मीळ रत्नें बाजारांत मांडिलीं असलीं पाहिजेत.”

आणि मूठभर मोहोरा घेऊन तो तिच्यापुढें ठेवीत असे!

## शोध

एक हजार वर्षांपूर्वी लेबॅनॉनच्या उतरणीवर दोन तत्त्वज्ञांची गांठ पडली. तेव्हां एक जण दुसऱ्याला म्हणाला, " तूं कोठें जात आहेस ? "

आणि दुसऱ्यानें उत्तर दिलें, " या डोंगरांतून उगम पावत असलेला यौवनाचा झरा मी शोधीत आहें. विकसित होऊन सूर्याकडे जाणाऱ्या त्या झऱ्याविषयीं मला कांहीं आलेख सांपडले आहेत. पण तूं काय शोधीत आहेस ? "

पहिल्या मनुष्यानें उत्तर दिलें, " मी मृत्यूचें रहस्य शोधीत आहें."

तेव्हां त्या दोन तत्त्वज्ञांपैकीं प्रत्येकाला दुसऱ्याच्या महान् शास्त्रांतील उणीव उमगून आली. त्यांनीं वितंडवाद सुरू केला आणि आध्यात्मिक अंधत्वाचा दोषारोप ते परस्परांवर करूं लागले.

त्या वातावरणांत ते दोघे तत्त्वज्ञानी मोठमोठ्यानें वाद घालीत असतां एक त्रयस्थ—आपल्या स्वतःच्या खेड्यांत साधाभोळा समजला गेलेला एक मनुष्य—शेजारून गेला, आणि त्या दोघांतलें

जोरजोराचें भांडण जेव्हां त्यानें ऐकिलें तेव्हां तो जरा उभा राहिला आणि त्यानें त्यांचे युक्तिवाद ऐकिले.

नंतर तो त्यांच्याजवळ आला आणि म्हणाला, " भल्या गृहस्थांनो, तुम्ही तर खरोखर तत्त्वज्ञानाच्या एकाच पंथाचे अनुयायी असून एकाच गोष्टीविषयीं बोलत आहांत असें दिसतें. केवळ निराळे शब्द मात्र तुम्ही वापरीत आहांत. तुमच्यापैकीं एक जण यौवनाचा झरा शोधीत आहे आणि दुसरा मृत्यूचें रहस्य शोधीत आहे. पण खरोखर ते केवळ एकरूप आहेत, आणि तुम्हां उभयतांमध्यें ते एकरूपत्वानेंच वास करीत आहेत."

आणि तो त्रयस्थ ' नमस्कार, ऋषिवर्यांनो ' असें म्हणून परत फिरला. आणि परत फिरतांना त्यानें गंभीर असें हास्य केलें.

क्षणभर निःस्तब्ध होऊन त्या दोघां तत्त्वज्ञांनीं परस्परांकडे पाहिलें आणि नंतर तेहि हंसूं लागले. आणि त्यांच्यांपैकीं एक जण म्हणाला, " ठीक तर, आतां आपण दोघे मिळूनच जाऊं आणि शोधूं या ना ? "

## लांछित राजदंड

राजा आपल्या पत्नीला म्हणाला, " तूं राणी म्हणून मुळींच शोभत नाहींस. माझी सहचरी व्हायला तूं अगदींच अडाणी आणि ओबडधोबड आहेस."

राणी म्हणाली, " महाराज, आपण राजे आहोंत असें तुम्हांला वाटतें. पण खरोखर, तुम्ही केवळ भिकारडे आहांत."

या शब्दांनीं राजाला राग आला. त्यानें हातानें आपला राजदंड उचलला आणि राणीच्या कपाळावर त्या सोनेरी राजदंडाचा प्रहार केला.

त्या क्षणीं राजाचा खाजगी कारभारी आंत आला आणि म्हणाला, " छान, छान, महाराज! तो राजदंड या देशांतील अत्यंत कुशल कारागिराकडून तयार करविलेला होता. हाय! तुमची आणि राणीसाहेबांची स्मृति एकादे दिवशीं नष्ट होऊन जाईल; पण एक सुंदर वस्तु म्हणून हा राजदंड पिढ्यान् पिढ्या जतन करून ठेविण्यांत

येईल; आणि महाराणीवरील आपल्या प्रहारानें रक्तलांछित झालेल्या या राजदंडाचा, महाराज, आतां तर विशेष परामर्श घेतला जाईल आणि त्याची चांगली आठवण राहील.''

## मार्ग

एक स्त्री आपल्या मुलासह डोंगराळ प्रदेशांत रहात होती. तिचा तो पाहिला आणि एकुलता एक मुलगा होता.

आणि तो मुलगा तापानें वारला; त्या वेळीं वैद्य जवळच उभा होता.

ती माता दुःखानें वेडीपिशी झाली आणि वैद्याला तिनें आक्रंदून विचारलें, " मला सांगा, मला सांगा, कीं त्याची हालचाल कशानें बंद पडली आणि त्याचें गीत कशानें निःस्तब्ध झालें ? "

आणि तो वैद्य म्हणाला, " तापानें."

त्यावर ती माता म्हणाली, " ताप म्हणजे काय ? "

आणि त्या वैद्यानें उत्तर दिलें, " मला तें स्पष्ट करून सांगतां येणार नाहीं. पण आपल्या शरीरांत शिरणारें तें अत्यंत सूक्ष्म असें कांहीं आहे, आणि आपल्या चर्मचक्षूंनीं तें आपण बघूं शकत नाहीं."

त्यानंतर तो वैद्य निघून गेला. आणि पुनः-पुनः ती स्वतःशींच म्हणत राहिली, " कांहींतरी अत्यंत सूक्ष्म! आपल्या चर्मचक्षूंनीं आपण तें बघूं शकत नाहीं!"

आणि सायंकाळीं तिच्या सांत्वनाकरितां उपाध्याय आला. आणि आक्रांत करून ती किंचाळली, " अहो, कसा हो माझा मुलगा गेला? माझा एकुलता एक, पहिला मुलगा!"

आणि तो उपाध्याय म्हणाला, " मुली, ती परमेश्वराची इच्छा!"

आणि ती स्त्री म्हणाली, " परमेश्वर म्हणजे काय आणि परमेश्वर कोठें आहे? मी परमेश्वराची भेट घेईन आणि त्याच्यापुढें माझें हृदय फाडून त्याच्या चरणांवर माझ्या हृदयांतल्या रक्ताचा अभिषेक करीन. मला सांगा, कीं मला तो कोठें सांपडेल?"

आणि तो उपाध्याय म्हणाला, " परमेश्वर अत्यंत विशाळ आहे. आपल्या चर्मचक्षूंना तो दिसूं शकणार नाहीं."

तेव्हां ती स्त्री ओरडली, “ अत्यंत विशालाच्या इच्छेनुसार अत्यंत सूक्ष्मानें माझ्या मुलाचा वध केला ! तर मग आपण कोण आहोंत? आपण कोण आहोंत ? ”

त्याच वेळीं त्या स्त्रीची आई त्या मृत मुलासाठीं आणिलेल्या प्रेतवस्त्रासह त्या खोलींत आली, आणि तिनें त्या उपाध्यायाचे शब्द आणि आपल्या मुलीचा हंबरडाहि ऐकिला. तिनें तें प्रेतवस्त्र खालीं ठेविलें आणि आपल्या मुलीचा हात स्वतःच्या हातांत घेऊन ती म्हणाली, “ माझ्या मुली, आपण स्वतःच तें अत्यंत सूक्ष्म आणि अत्यंत विशाल आहोंत; आणि त्या दोघांना जोडणारा मार्गाहि आपणच आहोंत.”

## देवमासा आणि मधमाशी

एकदां सायंकाळीं एक पुरुष आणि स्त्री योगायोगानें एकाच भाड्याच्या गाडींत एकत्र आलीं. पूर्वींहि त्यांची भेट झाली होती.

तो पुरुष कवि होता, आणि तो त्या स्त्रीच्या शेजारींच बसला असल्यानें गोष्टींनीं तिची करमणूक करण्याचा त्यानें प्रयत्न केला. त्या गोष्टींपैकीं कांहीं गोष्टी त्यानें स्वतःच रचिल्या होत्या आणि कांहीं दुसऱ्यांच्या होत्या.

पण त्याचें बोलणें चालू असतांना त्या स्त्रीला झोंप लागली. नंतर एकाएकीं ती गाडी कलंडली तेव्हां जागी होऊन ती म्हणाली, “ जोना आणि देवमासा यांच्या गोष्टीचें तुमचें स्पष्टीकरण मला कौतुकास्पद वाटतें.”

आणि तो कवि म्हणाला, “ पण बाईसाहेब, मी तर तुम्हांला एक मधमाशी आणि एक शुभ्र गुलाब हे परस्परांशीं कसे वागले, याविषयींची माझी स्वतःची गोष्ट सांगत होतों ! ”

## संसर्गजन्य शांति

एक लुसलुसीत शाखा आपल्या शेजारच्या शाखेला म्हणाली, "अगदीं उदास आणि शून्य दिवस आहे हा!" आणि दुसऱ्या शाखेनें उत्तर दिलें, "खरोखरीच, शून्य आणि उदास!"

त्याच वेळीं त्या शाखांपैकीं एका शाखेवर एक चिमणी येऊन बसली, आणि नंतर तिच्या शेजारीं दुसरी एक चिमणी आली.

त्यांच्यापैकीं एक चिमणी चिंवचिंव करून म्हणाली, "माझा साथी मला टाकून गेला."

आणि दुसरी चिमणी म्हणाली, "माझा साथीहि निघून गेला असून तो आतां परत येणार नाहीं. पण मला काय त्याची पर्वा?"

त्यावर त्या दोघींनीं कलकलाट करून एक-मेकींची खरडपट्टी काढायला आरंभ केला, आणि लवकरच त्यांच्यांत झुंज लागून त्या वातावरणांत त्यांचे कर्कश आवाज घुमूं लागले.

तोंच एकाएकीं आकाशांतून उडत उडत आणखी दोन चिमण्या आल्या आणि बेचैन झालेल्या त्या दोघींच्या शेजारीं निमूटपणें बसल्या.

नंतर त्या चौघीहि जोडीजोडीनें एकदमच उडून गेल्या.

आणि ती पहिली शाखा आपल्या शेजारच्या शाखेला म्हणाली, " काय भयंकर कोलाहल माजला होता ! " आणि दुसरी शाखा म्हणाली, " काय हवें तें म्हण. सध्यां तरी प्रशांत आणि प्रशस्त आहे खरें ! आणि वरच्या वातावरणांत शांतता असली, कीं मला वाटतें, खालीं राहणारेहि सलोख्यानें नांदतात. वायूसंगें हेलावत तूं जरा माझ्याजवळ येशील ? "

आणि पहिली शाखा म्हणाली, " होय, केवळ शांतीसाठीं, वसंत संपण्यापूर्वीं."

आणि नंतर तिला आलिंगन देण्याकरितां सोसाट्याच्या वाऱ्यासह ती शाखा स्वतःच आंदोलित झाली.

## सांवली

जून महिन्यांतल्या एके दिवशीं गवत एल्म-वृक्षाच्या सांवलीला म्हणालें, " तूं वारंवार इकडे-तिकडे हालतेस आणि माझी शांति बिघडवितेस."

आणि त्या सांवलीनें उत्तर दिलें. " मी नव्हे, मी नव्हे. जरा वर बघ. सूर्य आणि पृथ्वी यांच्यांत असणारा एक वृक्ष वाऱ्यामध्यें इकडेतिकडे हालत आहे."

आणि त्या गवतानें वर पाहिलें, तों अगदीं पहिल्या प्रथमच तो वृक्ष त्याच्या दृष्टीस पडला. आणि तें आपल्या हृदयांत म्हणालें, " ओहो, बघा, माझ्यापेक्षांहि मोठें गवत ! "

आणि मग तें गवत गप्प बसलें.

## कवि आणि वृद्ध राणी

एक तरुण कवि राणीला म्हणाला, "मी तुझ्यावर प्रेम करतों." आणि त्या राणीनें उत्तर दिलें, "आणि माझ्या मुला, मीहि तुझ्यावर प्रेम करतें."

"पण मी तुझें मूल नव्हे. मी पुरुष आहें आणि पुरुष म्हणून मी तुझ्यावर प्रेम करतों."

आणि ती म्हणाली, "अनेक मुलांमुलींची मी माता आहें. तीं मुलेंमुलीहि अनेक मुलांमुलींचे आईबाप आहेत. आणि माझ्या एका मुलाचा मुलगा तुझ्याहून मोठा आहे."

आणि तो तरुण कवि म्हणाला, "पण मी तुझ्यावर प्रेम करतों."

नंतर थोडक्याच काळांत ती राणी मरण पावली. पण पृथ्वीमातेच्या दीर्घ श्वासांत आपला अखेरचा श्वास सामावून जाण्यापूर्वीं स्वहृदयांत ती म्हणाली, "माझ्या लाडक्या, माझ्या एकुलत्या एक मुला, माझ्या तरुण कविवरा, अजूनहि कदाचित् एकाद्या दिवशीं पुनः आपली भेट होईल आणि त्या वेळीं मी सत्तर वर्षांची नसेन!"

## ईश्वराचा शोध

दोन माणसें पर्वतखोऱ्यांतून हिंडत होतीं. पर्वताच्या बाजूला अंगुलिनिर्देश करून त्यांपैकीं एक जण म्हणाला, "ती पर्णकुटी तुला दिसते ना? बऱ्याच कालापासून जगाशीं आपला संबंध ज्यानें तोडून टाकिला आहे, असा एक मनुष्य तेथें रहात आहे. तो केवळ ईश्वराचा शोध करीत आहे, आणि या पृथ्वीवर त्याला दुसऱ्या कशाचीच इच्छा नाहीं."

आणि दुसरा मनुष्य म्हणाला, "आपली पर्णकुटी आणि त्या पर्णकुटीचा एकाकीपणा यांचा त्याग करून आमच्या आनंदांत आणि दुःखांत सहभागी होण्याकरितां, लग्नांतल्या मेजवानीच्या प्रसंगीं आमच्या नर्तिकांबरोबर नृत्य करण्याकरितां आणि आमच्या मृतांच्या शवपेटिकांभोंवतालच्या लोकांबरोबर शोक करण्याकरितां आमच्या जगांत जोंवर तो परत येत नाहीं, तोंवर परमेश्वर त्याला सांपडणार नाहीं."

दुसऱ्या मनुष्याच्या अंतःकरणाला त्याचें तें म्हणणें पटलें. पण त्याचें म्हणणें पटूनहि तो उत्तरला, " तूं म्हणतोस तें सर्व मला मान्य आहे ; तथापि माझी खात्री आहे, कीं तो ऋषि एक सज्जन मनुष्य आहे. आणि अनेक माणसांच्या वर-वरच्या चांगुलपणापेक्षां एक सज्जन मनुष्य आपल्या अनुपस्थितीनें अधिक भलें करीत आहे, हें चांगलें नाहीं का ? "

## निर्झर आणि नदी

प्रचंड नदी वहात असलेल्या कादिशाच्या खोऱ्यांत दोन चिमुकल्या निर्झरांची भेट झाली आणि त्यांचें परस्परांशीं बोलणें झालें.

एक निर्झर म्हणाला, "माझ्या मित्रा, तूं कसा आलास? तुझा रस्ता कसा काय होता?"

आणि दुसऱ्यानें उत्तर दिलें, "माझा रस्ता अत्यंत अडचणीचा होता. पाणचक्कीचें चाक मोडून गेलें आणि माझा प्रवाह वळवून मला आपल्या रोपट्यांकडे नेणारा तो शेतमालक मरण पावला. निरुद्योगी असल्यामुळें जे केवळ स्वस्थ बसून राहून आपलें आलस्य उन्हांत भाजीत असतात, त्यांच्या घाणीसह पाझरत पाझरत धडपड करून मी खालीं आलों. पण, माझ्या बंधुराया, तुझा रस्ता कसा होता?"

आणि त्या दुसऱ्या निर्झरानें उत्तर दिलें, "माझा रस्ता अगदीं वेगळाच होता. सुगंधित पुष्पें आणि लाजऱ्या लता असलेल्या टेकड्यांमधून

मी खालीं उतरलों. रौप्य-पात्रांतून स्त्री-पुरुषांनीं माझें प्राशन केलें, चिमुकुल्या बालकांनीं आपले गुलाबी पाय माझ्या कांठांवरच्या पाण्यांत डुंबविले. माझ्या आसमंतात् हास्यध्वनी दुमदुमत होते आणि मधुर गीतें हेलावत होतीं. तुझा रस्ता असा सुखदायक नव्हता हें किती करुणास्पद ! ”

त्याच क्षणीं ती नदी उच्च स्वरानें म्हणाली, “ चला, चला, आपणांला समुद्राकडे जावयाचें आहे. चला, चला, अधिक बोलूं नका. आतां माझ्याबरोबरच असा. आपण समुद्राकडे जात आहोंत. चला, मला येऊन मिळा ; कारण मला येऊन मिळालांत म्हणजे तुमच्या दुःखद अथवा मजेदार प्रवासाचा तुम्हांला विसर पडेल. चला, चला. आणि आपल्या सागरमातेच्या हृदयाशीं जेव्हां आपण जाऊन पोहोंचूं, तेव्हां आपल्या सर्व मार्गांची तुम्हांला आणि मला स्मृतीहि उरणार नाहीं.”

## दोन पारधी

मे महिन्यांतल्या एके दिवशीं आनंद आणि दुःख यांची एका सरोवराजवळ गांठ पडली. परस्परांना अभिवादन करून त्या शांत जलाशया-शेजारीं ते जाऊन बसले, आणि संभाषण करूं लागले.

पृथ्वीवरच्या सौंदर्याविषयीं, वनांतील आणि डोंगरांतील जीवनाच्या दैनंदिन चमत्काराविषयीं आणि उषःकालीं व संध्यासमयीं ऐकूं येणाऱ्या गीतांविषयीं आनंद बोलत होता.

आणि आनंदाचें सगळें म्हणणें स्वतःला मान्य असल्याचें दुःखानें सांगितलें. कारण, घडी-घडीचा चमत्कार आणि त्याचें सौंदर्य यांचा दुःखाला चांगला परिचय होता. आणि मैदानां-तल्या आणि डोंगरांतल्या मे महिन्याबद्दल बोलत असतां दुःखाची वाणी बहरून आली होती.

अशा रीतीनें आनंद आणि दुःख यांनीं बराच

वेळ वार्तालाप केले, आणि त्यांना ठाऊक असलेल्या सर्व गोष्टींबद्दल त्यांचें एकमत झालें.

त्याच वेळीं सरोवराच्या दुसऱ्या तीरावरून दोन पारधी जात होते. आणि ते पलीकडच्या तीराकडे बघत असतां त्यांच्यांतील एक जण म्हणाला, " मला आश्चर्य वाटतें, कीं तीं दोन माणसें कोण आहेत ? " आणि दुसरा म्हणाला, " तूं दोन म्हणतोस? मला तर केवळ एक जणच दिसतो."

पहिला पारधी म्हणाला, " पण तेथें दोघे जण आहेत." आणि दुसरा म्हणाला, " मला तर तेथें केवळ एक जणच दिसत आहे, आणि सरोवरांतहि फक्त एकच प्रतिबिंब आहे."

" नाहीं, ते दोघे जण आहेत," पहिला पारधी म्हणाला, " आणि त्या शांत पाण्यांत दोन माणसांचीं प्रतिबिंबें दिसत आहेत."

पण तो दुसरा पारधी पुनः म्हणाला, " मला तर फक्त एकच दिसत आहे." आणि पुनः

पहिला उद्गारला, “पण मला दोघे स्पष्टपणें दिसतात.”

आणि अगदीं आजहि एक पारधी म्हणत असतो, कीं दुसऱ्या पारध्याला दुहेरी दिसतें; उलट, तो दुसरा म्हणतो, कीं “माझा मित्र जरासा आंधळा आहे.”

## आणखी एक प्रवासी

एकदां रत्यावरचा एक वेगळाच मनुष्य मला भेटला. तोहि जरासा वेडसरच होता, आणि तो मला सांगूं लागला:

"मी एक भटक्या आहें. पुष्कळदां असें भासतें, कीं या पृथ्वीवर ठेंगू लोकांतच मी वावरत आहें. आणि त्यांच्या डोक्यापेक्षां माझें डोकें जमिनी-पासून सत्तर हात उंच असल्यामुळें त्याच्यांत उच्च आणि स्वतंत्र विचार प्रसवतात.

"पण खरें म्हटलें म्हणजे, मी लोकांमध्यें वावरत नसून त्यांच्यापेक्षां उच्च अशा पातळीवरून विचरत आहें; आणि त्यांच्या मोकळ्या मैदानांत उमटलेलीं माझीं पाउलेंच तेवढीं त्यांना दिसूं शकतात.

"आणि माझ्या पाउलांच्या आकार-मापा-विषयीं त्यांना चर्चा करितांना आणि वर्दळीवर येतांना मीं अनेकदां ऐकिलें आहे. कित्येक जण म्हणतात, 'फार प्राचीन काळीं पृथ्वीवर भटक-

णाऱ्या एका प्रचंड प्राण्याच्या या खुणा आहेत.' आणि दुसरे म्हणतात, 'नाहीं, दूरवरच्या ताऱ्यांवरून खालीं पडलेल्या उल्कांचीं हीं स्थानें होत.'

"पण माझ्या मित्रा, तुला तर पूर्णपणें माहीत आहे, कीं एका भटक्याच्या पाउलांशिवाय तें दुसरेंतिसरें कांहीं नाहीं."